ॐ श्रीगणेशाय नमः । शौनक म्हणती सूताप्रत । सर्वसिद्धिप्रद आख्यान अद्भुत । तूं सांगितले आम्हांप्रत । परी तृप्ति न झाली ।।१।। अमृतपानें जैसा पूर्ण तृप्त । नर जैसा न होत । पुनःपुन्हा तें पान इच्छित । तैसी स्थिति माझी असे ।।२।। दक्षानें मुद्गलापासून । ऐकिलें जें चरित्र महान । सर्वसंमत प्रसन्न । पुनरपि मज सांगावें ।।३।। सूत म्हणे ऐका वृत्तान्त । सूर्य वालखिल्य संवाद ऐकत । ब्रह्मदायक तो पुनीत । तेव्हा दक्ष विनवी मुद्गलासी ।।४।। ऐकलें हेरंबमाहात्म्य ब्रह्मप्रद । आणखी सांगा मोदप्रद । अद्भुत तैसें सुखप्रद । महोदराचे चरित्र मजला ।।५।। योगिसत्तमा सारखें ऐकिलें । तरी चित्त ना तृप्त झालें । ऐसें हें कथानक भलें । ब्रह्ममय सुधेसम ।।६।। दक्षाचें वचन ऐकत । हृष्टरोमा मुद्गल जें सांगत । तें ऐकावें स्वस्थचित्त । शौनक महर्षे आपण ।।७।। युधिष्ठिरें महोदर मानप्रद । आराधिला मोक्षप्रद । विशेषभावें तो सुखद । योगी झाला पांडव ।।८।। दक्ष म्हणे मुद्गलाप्रत । युधिष्टिराचे सांगा चरित । चंद्रवंश उत्पत्तिपासून आद्यंत । पुण्यप्रद तें होईल ।।९।। अत्रीच्या नेत्रांतून । जन्मला पूर्वी चंद्र कांतिमान । त्यानें सेविला गजानन । दीर्घ तपें करुन ।।१०।। गणेशवरदान त्यास लाभत । नारायणांचा अधिप तो होत । तैसाचि औषधींचा स्वामी प्रतापयुक्त । विप्रांचा तो पति झाला ।।११।। पुढें तो विप्रराजा मोहित । गणेश भजनाचा त्याग करीत । जाहला अत्यंत भोगयुक्त । विघ्नपीडित त्या वेळीं ।।१२।। मोहांत पडून करित । कर्म अत्यंत निन्दित । बृहस्पतीची भार्या तारा असत । यौवनशालिनी रूपसुंदरी ।।१३।। एकदा ती तारा स्नान करित । उभी होती तीर्थांत । तिज पाहून मोहयुक्त । पकडिलें तिज चंद्राने ।।१४।। नको नको ती म्हणत । हाःहाकार मुखें करित । परी तें चंद्र न ऐकत । हट्ट करोनी चुंबन घेई ।।१५।। गुरुपत्नीचें घेऊन चुंबन । एकाकिनी तिज पाहून ।

घेऊन गेला तिज धरुन । पर्वत गुहांत त्या वेळी ।।१६।। तिजसवें नाना भोग भोगित । काम बाणांनी पीडित । भोगी तिजला मनसोक्त । बहुत काळ लोटला ।।१७।। तेव्हां तिच्या गर्भांत । चंद्राचें वीर्य वाढत । तरी तिज तो ना सोडित । मोहमग्न चंद्रमा ।।१८।। गर्भिणीसवें विषयासक्त । भोग भोगी चंद्र अविरत । तिकडे बृहस्पतीस तो वृत्तान्त । कळतां क्षुभित तो झाला ।।१९।। चन्द्रे कोठें नेली कान्ता । याचें ज्ञान त्याला होता । तेथे जाउनी प्रार्थिता । जाहला तो चंद्रासी ।।२०।। नाना यत्नें याचित । बृहस्पति चंद्रा सांगत । माझी तारा दे परत । भार्येवरी हक्क पतीचा असे ।।२१।। परी तो शठ न ऐकत । तेव्हां गुरु शिवास भजत । अंगिरस शिष्य शंभू होत । क्रोधयुक्त त्या वेळीं ।।२२।। इंद्रादि सर्व देवांसहित । चंद्रास मारण्या जात । क्रोधें अरुण नयन बलयुक्त । तेव्हां शशी घाबरला ।।२३।। होऊनीया भयभीत । चंद्र शुक्रासी शरण जात । त्या आंगिरसाच्या वैऱ्यासी देत । आश्रय तोही आनंदें ।।२४।। शुक्राचार्य दैत्यां बोलावित । प्रल्हाद प्रमुखां समस्त । त्यांच्यासवें लढण्या जात । शिवासवें तो महाबळी ।।२५।। तेव्हां त्यांचें तुमुल युद्ध होत । रोमहर्षक अद्भुत । देव दैत्यांचा विनाश होत । उभय पक्षीं तेधवां ।।२६।। एक मास युद्ध चालत । अहोरात्र ते लढत । देवगण दैत्यगण त्वेषांत । परी अन्त न लागे ।।२७।। त्या समयीं बृहस्पति चित्तांत । गणनायकासी स्मरत । आपणांसी मनीं निंदित । निंदा करी चंद्राचीही ।।२८।। म्हणे मी भ्रातृविरोध केला । त्यानें ज्ञानाचा नाश झाला । गणेश चित्तांतून गेला। म्हणोनि विघ्न सांप्रत आलें ।।२९।। देव दैत्यांचा नाश होत । मजकारणें हा अद्भुत । काय होणार पुढें रणांत । गजानना तुज नमन असो ।।३०।। ढुंढे देवा तुज नमन । आता करी मज निर्विघ्न । दयानिधे मूल उच्छेदन । देव दैत्यांचें न व्हावें ।।३१।। तैशाचि परी चंद्रही चित्तांत ।

देवा गजाननासी स्मरत । विघ्नहर तेव्हां करीत । त्या दोघांवरी कृपा ।।३२।। ब्रह्मा सर्वपितामह येत । तेव्हां त्या युद्ध क्षेत्रांत । देवदानवांचा विनाश होता ज्ञात । दयान्वित त्या वेळीं ।।३३।। शंकरादी देवांसी । तैसाचि प्रल्हादादी दानवांसी । करी विनंती उभयतांसी । युद्ध थांबवा हें दारुण ।।३४।। सर्वज्ञ विधाता होता उपस्थित । देवदानव युद्ध थांबवित । कर जोडूनी प्रणाम करित । युद्ध थांबलें विनाशकर ।।३५।। चंद्राचा तिरस्कार करुन । तारा बृहस्पतीस देऊन । म्हणे पतीची भार्या हें धर्मवचन । मूर्खा कैसें विसरलास? ।।३६।। तेव्हां बृहस्पती आणि चंद्रांत । गर्भाविषयीं वाद होत । तो कोणाचा गर्भ असत । चंद्राचा कीं बृहस्पतीचा? ।।३७।। तारेच्या उदरीं वाढत । गर्भ हें सत्य संशयातीत । परी तो कोणाचा हें निश्चित । देवगणांसी न समजे ।।३८।। तेव्हां विधि तारेस म्हणत । सूनबाई गर्भ त्यागावा त्वरित । कोणाचा हा अंश तें आम्हांप्रत । महाभागे सांग आतां ।।३९।। विधीची आज्ञा मानित । तारा गर्भाचा त्याग करित । तेव्हां पुत्र एक तेजयुक्त । जन्मला त्या गर्भांतून ।।४०।। त्या पुत्रास पाहून विस्मित । देव जाहले समस्त । तारा लाजेनें मान लववित । मौन तिन राखिलें ।।४१।। तेव्हां तो पुत्र स्वत: तेथ सांगत । ब्रह्मदेवासी आदरयुक्त । मी चंद्राचाच गर्भ असत । तारेनेंही मग तें मानिलें ।।४२।। देव त्या पुत्राचें नाम ठेविती । बुध ऐसें प्रसन्नमति । चंद्रासी मग तो पुत्र देती । ब्रह्मदेव तदनंतर ।।४३।। संग्राम समाप्त होत । सर्व देव दानव स्वगृहीं परतत । ऐसा पूर्वीं तारकांसाठीं होत । तारकामय संग्राम ।।४४।। दैत्यदेवांचा विनाश होत । अतीव भयंकर त्या युद्धांत । बुधाचें सांगितलें चरित । संपूर्ण तुजला दक्ष प्रजापते ।।४५।। बुधाचा पुत्र पुरूरवा होत । महायश तो इलेपासून जन्मत । तोही राजर्षि जगांत । पितृतृप्तिकर झाला ।।४६।। ओमिति श्रीमदान्त्ये

पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते बुधोत्पत्तिवर्णनं नामाष्टाविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अठ्ठावीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मुद्गल कथा पुढे सांगती । पुरूरवा राज्य करी धर्मनीति । मानवांसी भूमंडळी प्रीती । पाळिलें त्यानें पुत्रासम ।।१।। मुनिशापें स्वर्गभ्रष्ट होत । उर्वशी कुरुक्षेत्रीं अवतरत । तेथे पुरूरवा संचार करित । तिजवरी मोहित जाहला ।।२।। ती त्यास तेव्हां म्हणत । ज़री माझा संग तूं वांच्छित । तरी वचन दे मजप्रत । अटी माझ्या तूं पाळशील ।।३।। माझे प्रिय दोन मेंढे सुतसम असत । त्यांचे रक्षण करावें सतत । रतिक्रिडेव्यतिरिक्त । नग्न देह तुझा मज न दाखवी ।।४।। तुझ्या घरीं तर मी राहीन । केवळ तूप खाऊन जगेन । हें सर्वही मान्य करुन । भूपति तिज घेऊन गेला ।।५।। उर्वशीपासून त्यास होत । इंद्रासम तेजयुक्त सहा सुत । आयु मायु आमायुख्यात । विश्वायु शतायु स्थायु नाम ।।६।। ते सर्व चंद्रवंशाचे अलंकार । जयशाली होते सुंदर । इंद्रे पाठविले गंधर्व तदनंतर । पुरूरव्याच्या सदनांत ।।७।। विश्वावसु पुरोगम जात । उर्वशीस घेण्या परत । मायारूपें रात्रीं प्रवेशत । निद्रागृहांत तयाच्या ।।८।। उर्वशीचे दोन मेंढे चोरिती । त्यांसी पकडून नेती । तेव्हां ते करूणरवें ओरडती । तें ऐकलें उर्वशीनें ।।९।। ती म्हणे पुरूरव्याप्रत । कैसा तूं वीर्यहीन असत । माझे पुत्रसम मेंढे नेत । कोणी चोर परी स्वस्थ तूं? ।।१०।। तिचें तें वचन ऐकत । पुरूरवा तैं क्रुद्ध होत । रतिसुख सोडून नग्नचि उठत । खड्ग घेऊन धावला ।।११।। तत्क्षणीं देव निर्मित । वीज निद्रागृहीं चमकत । उर्वशी नृपा नग्न पाहत । अन्तर्धान पावली तत्क्षणीं ।।१२।। मेष घेऊन गंधर्व जात ।

आकाशमार्गें स्वर्गांत । उर्वशीसहित ते होती उपस्थित । इंद्रासन्निध सत्वर ।।१३।। इंद्रासी ते प्रणाम करित । इंद्र झाला हर्षयुक्त । राजा पुरूरवा स्वगृहांत । शोध करी उर्वशीचा ।।१४।। परी ती यशस्विनी न दिसत । तेव्हां तो हाहा:कार करित । त्वरित पडला भूपृष्ठावरी मूर्च्छित । सावध होता विलाप करी ।।१५।। वसुधातलावरी भ्रमण करित । सैरावैरा मूढचित्त । उर्वशी दर्शनार्थ आर्त । ऐसें एक वर्ष लोटलें ।।१६।। एकदा कुरुक्षेत्रांत भटकत । पुरूरवा तो दु:खार्त । तेथे उर्वशीस पाहत । दैवयोगें तैं आनंदला ।।१७।। म्हणे मज सोडून कोठें गेलीस । प्रिये मी तुझा असे दास । माझें प्रेम असे सुरस । आता माझा स्वीकार करी ।।१८।। मी असे भक्तिसंयुत । त्याग करुं नको माझा जगांत । या अप्सरासरोवरांत । ऐक माझी ही प्रार्थना ।।१९।। नंतर त्याच्या संगतींत । एक रात्र ती राहत । राजास म्हणे शोकयुक्त । ऐका माझें हितवचन ।।२०।। मी देवांची अप्सरा स्वर्गांत । गंधर्वांच्या अधीन असत । म्हणोनी पितृयज्ञें पितरांप्रत । आदरें तूं तोषवी ।।२१।। नंतर तुझा निवास स्वर्गांत । होईल परिणामरूप निश्चित । तेव्हां तुझ्या अधीन नित्य सतत । राहीन मीं राजेंद्रा ।।२२।। शोकाकुल पुरूरवा रडत । अति करुण तिच्या पुढ्यांत । त्यास विव्हल पाहून म्हणत । देवांगना तयाशी ।।२३।। प्रतिवर्षी राजा एक रात्रीं राहीन । तुझ्या संगतीत प्रसन्न मन । तुज सुखोपभोग देईन । ऐसें सांगून लुप्त झाली ।।२४।। राजानें उर्वशीचें वचन । मानिलें नंतर केलें हवन । पितृयज्ञ नेमें करुन । पितृगण त्यानें तुष्ट केले ।।२५।। पितर त्यास वर देत । उर्वशी तुझ्या अधीन सतत । महामते राहील निश्चित । ऐसें आमुचें वरदान ।।२६।। तुझ्या नामांकित देवांप्रत । हव्य अर्पितील श्राद्धांत । अक्षय पितृलोक तुज निश्चित । होईल वत्सा सर्वदा ।।२७।। ऐसे बोलून अन्तर्धान । भक्तवत्सल पितर

प्रसन्न । अल्पकाळानंतर निधन । जाहलें त्या पुरूरव्याचें ।।२८।। पुण्यबळें तो स्वर्गांत । पुरूरवा नृप जात । तेथे उर्वशीच्या समवेत । भोगूं लागला विषयभोग ।।२९।। स्वर्गोद्भव भोग भोगित । विषयप्रिय तो नृप आसक्त । ऐसा बहु काळ पितृलोकांत । राहिला पुरूरवा नृपति ।।३०।। तदनंतर एकदा जात । नारदमुनि पितृलोकांत । पुरूरव्यास बोध करित । दयेनें प्रेरित होऊन ।।३१।। नारद नृपास म्हणत । महाभागा तूं विषयांत । झालास एवढा आसक्त । आत्मपतन पावशील ।।३२।। हें तुज का न दिसत । देह हा बंधनागार असत । तेथे निगडबद्ध तूं असत । बंधहीन हो योगप्रभावें ।।३३।। ऐसे हे भोग नश्वर । भोगावें का तूं वारंवार । पुनः पुन्हा भोगूनही अज्ञानी नर । तृप्त न होती विषयसुखांत ।।३४।। तूं प्यावें ब्रह्मामृत । स्वानंददायक सतत । तें त्यागून अल्पसुखांत । सक्त होतां अधःपतन तुझें ।।३५।। चौऱ्यांशी लक्ष योनींत । प्राणि जन्म घेत फिरत । त्यांत स्त्रीपुत्रादिक लाभत । तयासी यांत संशय नसे ।।३६।। मनुष्ययोनींत जन्मत । तेव्हां सर्वार्थवान नर होत । त्या योनींत ज्ञानयुक्त । प्राणी होय विशेषें ।।३७।। जरी त्यास नरदेह लाभत । परी कर्म योग जो न साधित । तो नर नानायोनींत । पुनःपुन्हा मानदा फिरेल ।।३८।। द्वंद्वभावमय दुःख भोगित । तेथ ब्रह्मसुख नसे शाश्वत । तूं असुनी ज्ञान युक्त । ऐसे कां बा करतोस? ।।३९।। विषयसुखाचा हव्यास । सोडी तयाची तू आस । योगाभ्यासें स्वात्म्यास । तारून ने तूं नरसत्तमा ।।४०।। नारदाचा उपदेश ऐकत । तेव्हां पुरूरवा तयास सांगत । आपण योगिया उचित । उपदेश हा मज दिलात ।।४१।। माझ्या मनीं तो साठवला । परी विषयदोषें चित्ताला । क्षोभ अत्यंत जाहला। खिन्न झालें माझें मन ।।४२।। तरी महामुने सांगा ज्ञान । जेणें होईल मन पावन । तेव्हां नारद सांगे वचन । गणेशा भज तूं भावबळें ।।४३।।

तरी तुझें होईल क्षेम । एकाक्षर मंत्र उत्तम । गणेशाचा तू जपता निजनेम। विधिपूर्वक भक्तिभावें ।।४४।। हृदयांत जो बुद्धिप्रदाता । बाह्यत: सिद्धीचा दाता । योगाकार सर्वत्र नेता । ब्रह्मनायक तुज लाभेल ।।४५।। चित्ताचा त्याग करुन । तूं स्वयं हो चिंतामणि पावन । ऐसें बोलून मधुर वचन । एकाक्षर गणेश मंत्र दिला ।।४६।। नंतर त्याचा निरोप घेत । नारद स्वच्छंदे परतत । पुरूरवा उर्वशीचा त्याग करित । ध्यानीं मग्न जाहला ।।४७।। एकाक्षर गणेश मंत्र जपत । एकाग्र मनें तो अविरत । कालांतरानें तो होत । गाणपत्य थोर जगीं ।।४८।। तेव्हां पूर्व कर्म आठवत । तैं आपुली निंदा करित । त्यायोगे होत दु:खित । पुरूरवा तो अत्यंत ।।४९।। अहो मी अति मूर्खपणें केलें । पूर्वी ऐसें कर्मभोग कामबळें । स्त्रीकामें मोहून चित्त नासलें । भोगांत निमग्न मी झालों ।।५०।। अस्थिमांसमय देह असत । तो सदा दुर्गंधयुत । मूत्रगृह जें छिद्र त्यांत । त्यांत आसक्त कैसा झालों? ।।५१।। सर्व अर्थप्रद मनुष्य देह लाभला । परी त्याचा लाभ ना उठविला । नरकप्रद कर्मे करुन त्याला । भ्रष्ट केला मी नि:संशय ।।५२।। नरदेह लाभून । त्याचा लाभ न घेऊन । माझ्याविना कोण शठ दुर्जन । स्त्रींत आसक्त होईल? ।।५३।। गणपतीस सोडून विषयांत । सदैव मी झालों रत । धिक्कार असो मजप्रत । रतिसुखकर्दमीं बुडालों ।।५४।। ऐसा खेदयुक्त नृप करित । स्मरण गणेशाचें चित्तांत । भक्तिभावें तया पूजित । गणेशयोग तैं सिद्ध झाला ।।५५।। अंती योगबळें गणेशलोकीं जात । पुढतीं सायुज्यमुक्ति लाभत । ऐसा हा त्याचा महिमा असत । पापनाशकर महान ।।५६।। पुरूरव्याचें हे आख्यान । वाचितो वा ऐकतो जो जन । तो नरोत्तम पापमुक्त होऊन । गणेशाचा प्रिय होतो ।।५७।। ओमिति श्रीमदांत्ये पुराणोपनिषदि

श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते पुरूरवश्चरितकथनं नामैकोनत्रिंशोऽध्याय समाप्त : । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकोणतीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । मुद्गल दक्ष प्रजापतीस सांगती । कथा अति रंजक जगतीं । आयूस पाच सुत होती । स्वर्भानूच्या सुतेपासून ।।१।। दृढ विक्रम तेजयुक्त । प्रभेचे ते सर्व सुत । नहुष ज्येष्ठ त्यांच्यांत । शक्रतुल्य पराक्रमी ।।२।। सर्व राजांस त्यानें जिंकिलें । शंभर यज्ञ त्यानें केलें । इंद्राचें मन क्षुभित झालें । परी तो कांही करुं न शके ।।३।। राजा तो सर्व शास्त्रें जाणत । तेणें इन्द्र झाला शांत । गौतम महेंद्रा शापित । स्त्रीस भ्रष्ट केलें म्हणून ।।४।। इन्द्र राज्यभ्रष्ट होत । देव सारे भयातुर होत । दैत्यांचा उग्र वेग असह्य होत । त्या समयीं तयांना ।।५।। बृहस्पति जवळी जाती । क्षेमसाधना विचारिती । बृहस्पति तया सांगती । नहुषासी स्वर्गराजा करा ।।६।। तेजस्वी श्रेष्ठ नहुष होत । स्वर्गमंडळाचा इंद्र उन्नत । इंद्रासनीं तो बैसत । पालन करी सुरांचें ।।७।। देव मुनि वर देती त्यासी । तूं ज्याकडे क्रोधें पाहसी । सत्ताहीनता तयासी । लाभेल त्वरित निःसंशय ।।८।। नंतर अति तेजयुक्त । नहुष नराधिप तो होत । देवादी त्यास सेवित । अति गर्व झाला तयासी ।।९।। तो स्त्रीसंगाचा लालसी होत । शचीचा सहवास वांच्छित । पाठवी देवांस त्वरित । आणावया शचीसी ।।१०।। तेव्हां शची म्हणे देवांस कुपित । मी येणार नाही सांगा नहुषाप्रत । इंद्राची मी पत्नी असत । परपुरुषासी न सेवीन ।।११।। ऐसें सांगून देवांप्रत । बृहस्पतीच्या घरीं जात । शची तयासी विनवित । सुनेचें रक्षण करा म्हणे ।।१२।। तिची प्रार्थना ऐकून । देवगुरू तिज आश्रय देऊन । गौतमाजवळीं जाऊन ।

विनंती करी तयासी ।।१३।। महेंद्रासी करावें शापहीन । माझें वचन मानून । तेव्हा गौतम म्हणे उन्मन । काय करूं ते सांग मजला ।।१४।। उपाय मज तात सांगाल । तो मी झणीं करीन सबल । तेव्हां बृहस्पति सांगे युक्ति निर्मल । गौतमासी सुखप्रद ।।१५।। विनायकाचा मंत्र इंद्राप्रत । द्यावा गौतमा पुनीत । तें मानून इंद्राप्रत । दिधला गौतमें गणप-मंत्र ।।१६।। त्या मंत्राचा जप करित । देवदेवेशा गणेशास ध्यात । उत्तम तप आचरित । विदर्भप्रांतीं निर्जन वनीं ।।१७।। वायुभक्षण करून राहत । नासिकाग्रदृष्टी न्यस्त । विघ्नपासी तो पूजित । ऐसी गेलीं सहस्त्रवर्षे ।।१८।। तेव्हां भक्तवत्सल गजानन । वर देण्या आला प्रसन्न । इंद्राच्या तपें तोषून । सिंहारूढ तो महाबाहू ।।१९।। चतुर्भूजांनी विराजित । होता सिद्धिबुद्धींनी युत । नाभीवरी शेष रुळत । गजाननाच्या त्या वेळीं ।।२०।। इंद्रासी जागें करून । तपश्चर्येंत जो होता निमग्न । म्हणे माग वरदान । मनोवांच्छित सांप्रत ।।२१।। तेव्हा इंद्र करी वंदन । भक्तियुक्त मनें पूजून । सुस्थिर चित्तें स्तवन । यथामति करी गजाननाचें ।।२२।। गणाध्यक्षा भक्तसिद्धिदायका । देवा हेरंबा विनायका । अनादि सर्वादी आदिपूज्या पालका । विघ्नेशा सर्वपूज्या नमन ।।२३।। आदिमध्यान्त हीनासी । आदिमध्यमयासी । अंत्यरूपासी देवेशासी । विघ्नहर्त्यासी नमन असो ।।२४।। पाशांकुशधरासी अमेयासी । सिंहवाहनासी नाना मायाधरासी । अभक्तांना विघ्नकर्त्यासी । सदा स्वानंदवासीसी नमन ।।२५।। सिद्धिबुद्धिपतीसी नाभिशेषासी । ब्रह्मादी ब्रह्मरूपासी । ब्रह्मदात्यासी कृपालवासी । पूर्णासी पूर्णभावज्ञा नमन ।।२६।। धर्मअर्थकाममोक्षदात्यासी । पूर्णानंद प्रदात्यासी । कर्त्यासी, हर्त्यासी, सुपात्रासी । गणेशासी नमन असो ।।२७।। सूक्ष्मांत सूक्ष्मरूपासी । स्थूलांत स्थूलभोक्त्यासी । स्थूलसूक्ष्मादी हीनासी ।

लंबोदरा तुज नमन असो ।।२८।। तुझी काय मीं करूं स्तुति । तूं सदा शांतिरूप जगतीं । म्हणोनि करूं तुज प्रणती । त्यानें तुष्ट हो दयाकरा ।।२९।। ऐसी स्तुति ऐकून । मघव्याची भक्ति पाहून । गणेश बोले प्रसन्नमन । भक्तोत्तमा त्या वेळीं ।।३०।। इंद्रा तुझें हे स्तुतिस्तोत्र मजप्रत । जाहलें प्रिय अत्यंत । भुक्तिमुक्तिप्रद निश्चित । होईल वाचकां श्रोत्यांसी ।।३१।। देवेंद्रा तूही नित्य वाचन । करी या स्तोत्राचें पावन । तेणें होशील विघ्नविहीन । महामते महाभागा ।।३२।। तुझ्या स्तोत्रानें मीं तुष्ट असत । वर माग जें ईप्सित । तें पुरवीन समस्त । तेव्हां इंद्र प्रणाम करी ।।३३।। म्हणे करांजली जोडून । मजला करी निर्विघ्न । माझें इंद्रपद मज लाभून । तुझी भक्ति दृढ करी ।।३४।। तुझ्या पदकमलीं जडावें मन । हें क्षेत्र लाभो माहात्म्य महान । गणेश क्षेत्रांत श्रेष्ठत्व पावन । सर्वार्थप्रद हें तीर्थ करी ।।३५।। तुझ्या पदाचा स्पर्श होऊन । तीर्थ हें तुझें पावन । करितां यात विधिवत् स्नान । स्वानंदप्राप्ती जनां व्हावी ।।३६।। कदंब नाम तीर्थक्षेत्रांत । हें गणेश तीर्थ व्हावें ख्यात । विघ्नपा तुझ्या प्रसादें चिंतित । भक्तजनांचें पूर्ण व्हावे ।।३७।। तथास्तु ऐसें वरदान । देऊन गणेश पावला अन्तर्धान । तेव्हां करी संस्थापन । गणनाथाची मूर्ति इंद्र ।।३८।। त्या मूर्तीची पूजा करून । तेथे राहिला ध्यानमग्न । गणनायकाचें करी मनन । आनंद चित्तीं तयाच्या ।।३९।। आतां नहुषाचा वृत्तान्त । दक्षा सांगतों तुजप्रत । गणेश त्या नृपासी करित । विघ्नयुक्त तदनंतर ।।४०।। बृहस्पतीसी नहुष सांगत । इंद्र झाला असावा मृत । तो जनांसाठी कोठें न दिसत । शची द्यावी मज आतां ।।४१।। वाक्पति बृहस्पति त्यास म्हणत । होउनी क्रोधसमन्वित । ब्राह्मणांनी वाहिल्या पालखींत । बैसोनि जाई शचीप्रती ।।४२।। नाना वाहनांतून देवेंद्रे नेलें । आजपर्यंत कौतुक केलें । अपूर्व वाहन मनीं

इच्छिलें । शचीनें ऐसें मज कळलें ।।४३।। म्हणोनि तैसें करावें सांप्रत । नहुषासी तें मान्य होत । तो तैसेंचि करी मदोन्मत्त । ब्राह्मणांसी बोलाविलें ।।४४।। तो दुरात्मा बलात्कार करित । द्विजांसी पालखीस जोडित । त्यांच्या चित्तीं दुःख बहुत । तेथे आला आत्रेय ।।४५।। त्या दुर्वासासी जोडित । पालखी वाहण्या आज्ञा देत । नहुष द्विजभोयांसी म्हणत । शीघ्र गतीनें चला तुम्ही ।।४६।। शचीच्या महालाप्रत । पालखी न्यावी माझी त्वरित । 'सर्पध्वं'"ऐसें संस्कृतांत । सांगे मोहसंयुक्त तो ।।४७।। लाथ मारी दुर्वासाप्रत । तो मुनि होत अत्यंत कुपित । शाप सुदारुण देत । सर्प हो तूं महादुष्टा ।।४८।। सर्प होऊनि पड भूवर । ऐसा शाप अति उग्र । दुर्वासमुखांतून ऐकतां नृपवर । गर्वहीन तो जाहला ।।४९।। पालखीतून खालीं उतरत । दुर्वासासी प्रणाम करित । म्हणे उःशाप द्यावा मजप्रत । दया करी कृपाळा ।।५०।। धिक्कार असो माझा जगांत । ब्राह्मणाच्या विपरीत । वागलों मीं मोहें उद्धत । आतां तारी महामुने ।।५१।। तेव्हां पाहून त्यास संतप्त । मुनिसत्तम दुर्वास म्हणत । मनीं होऊन दयावंत । तुझ्या वंशी जन्म घेईल ।।५२।। नहुषा धर्म साक्षात् । युधिष्ठिर रूपें जेव्हां जगांत । तेव्हां त्याचे दर्शन तुजप्रत । तारक होईल निःसंशय ।।५३।। त्यानें कथिलेलें ज्ञान । ऐकतां होशील शापहीन । तोपर्यंत सर्प होऊन । महीतलावरी राहशील ।।५४।। राजा द्विजगण सदा जगांत । पूजनीय सर्व जनांप्रत । त्यांच्या अपमानें पापयुक्त । वाहक त्यांना करून ।।५५।। ह्या कृत्यानें अतिधर्मलोप झाला । तेणें तुज शाप मिळाला । धर्माचें निरीक्षण करतां तुजला । धर्मसंपन्नत्व लाभेल ।।५६।। ऐसें बोलून दुर्वास जात । स्वेच्छापरायण स्वाश्रमाप्रत । नहुष सर्प होऊन पडत । धरणीतलावर तत्क्षणीं ।।५७।। तदनंतर इन्द्रासी आणून । इन्द्रानसनावरी बैसवून । देवांसहित करी सन्मान ।

बृहस्पति तयाचा ।।५८।। नहुष सर्परूपें वनांत । गणेशा स्मरून चित्तांत । स्वच्छन्दें होता फिरत । म्हणे विघ्नयुक्त सर्व जग ।।५९।। विघ्नेशें मज विघ्नसंयुक्त । केलें असे निश्चित । त्यासी आतां शरण जात । तरी सर्व शुभ होईल ।।६०।। त्या नहुषानें जिंकिलें । गणेशस्मरणें चित्त आपुलें । गाणपत्य भक्तियुक्त झालें । जीवन सर्प देहधराचें त्या ।।६१।। ऐसा बहुत काळ जात । युधिष्ठिर त्या वनांत येत । भावांसहित द्रौपदीयुक्त । द्यूतदोषानें जेव्हां ।।६२।। फळें संग्रह करण्या जात । भीम तेव्हां त्या वनांत । नहुष त्यास ओळखून जखडित । आपुल्या वेटोळ्यांत सत्वर ।।६३।। आपुल्या अंगानें आवृत । भीमास भूतळीं पाडवित । बलशाली भीम ओरडत । उच्चरवें त्या समयीं ।।६४।। मेघगर्जनेसम नाद होत । तो धर्मराज ऐकत । सत्वर भीमासमीप जात । काय जाहलें पहावया ।।६५।। भीम सर्पानें वेष्टित । पाहून दुःख समन्वित । तेव्हां तो महाबळ नाग म्हणत । युधिष्ठिरासी ऐसें वचन ।।६६।। मी नहुष नामा असत । पुत्रा तुझ्या दर्शना उत्कंठित । भीमासी पकडिलें या वनांत । तूं येथ यावास म्हणोनी ।।६७।। मी आतां प्रश्न विचारीन । त्याचें योग्य उत्तर देऊन । जरी संतोषवीशील माझें मन । तरीच भीमास सोडीन ।।६८।। तूं सर्वज्ञ ऐसी कीर्ति जगांत । म्हणोनी ही परीक्षा घेत । नहुषाचें वचन ऐकून हर्षित । युधिष्ठिर म्हणे तयासी ।।६९।। महाभागा आपुल्या वंशांत । तूं ससी पूर्वज भूषणभूत । नागरूपा विचारी त्वरित । संशयप्रश्न आपुले ।।७०।। हे पूर्वजा तूं मान्य असत । तुझ्या प्रसादें मज जें ज्ञात । तें मानदा तुजप्रत । सांगेन मी यथामति ।।७१।। तेव्हां नहुष तया विचारित । कोणतें सत्य कोणतें अनृत । पाप बंध मोक्षरूप । उत्तम धर्म जगांत । योग ध्यानरूप कोणतें? ।।७२।। कर्म कोणतें अकर्म कोणतें । विकर्म कोणतें ज्ञान कोणतें । तपोमूल काय

असतें । दैवत तें मज सांगावें ।।७३।। कोणतें सार काय असार । मान्य कोणतें भूवर । अवमान्य काय तें सत्वर । युधिष्ठिरा सांग मजला ।।७४।। ह्या प्रश्नांची उत्तरें देशील । तरी भीमा सोडीन मी महाबळ । स्वेच्छेनें मी जाईन यथाकाल । सर्वज्ञत्व तुझें जाणून ।।७५।। युधिष्ठिर तेव्हां उत्तर देत । म्हणे सत्य तें ब्रह्म जगांत । जग असें अनृत । धर्म म्हणजे स्वधर्म ।।७६।। राजसत्तमा ऐसें ज्ञान । पाप तें स्वधर्महीन । मी माझें हा भव बंध असून । तो सुटणें हा मोक्ष असे ।।७७।। चित्तरोध योग ख्यात । निर्विषय मन ध्यान असत । कर्म म्हणजे सत्कर्म विज्ञात । ऐसें विबुधीं जाणावें ।।७८।। ब्रह्मार्पणात्मक सर्व अकर्म असत । विकर्म तें पापाचरण ज्ञात । सर्व शास्त्रें ऐसें सांगत । मी ब्रह्म हें ज्ञान असे ।।७९।। द्वंद्व समात्मक तप ख्यात । गणेश सर्व पूज्य दैवत । देवाचें भजन सार असत । नवधा तें प्रकीर्तित ।।८०।। विषयांचें नवधा भजन । असार तें अपावन । वेद पुराणांचें वचन । स्मृतिवचन मान्य असे ।।८१।। वेदाधारविहीन असत । तें अवमान्य जगांत । सर्वेश संस्थित हृदयांत । बुद्धि प्रचालक जाणावा ।।८२।। ऐसें सर्व तुज सांगितलें । आतां अनिलात्मजाते पाहिजे सोडिलें । एवढ्यांत तेथ आलें । सहसा एक दिव्य विमान ।।८३।। दिव्यभोगें समायुक्त । विमान अवतरलें पुढ्यांत । युधिष्ठिर तें पाहत । नहुषें सोडिलें भीमातें ।।८४।। सर्पदेहाचा त्याग करित । नहुष चढला त्या विमानांत । तदनंतर तो जात स्वर्गांत । विराजला अर्धासनीं इन्द्राच्या ।।८५।। अनन्यचित्तें गणेशासी भजत । स्वर्गसुख भोगून अन्ती जात । शुक्ल गतीनें गजाननाप्रत । विघ्नहीन तो जाहला ।।८६।। पुण्यश्लोक म्हणून ख्यात । जाहला नहुष जगतांत । पापनाशक त्याचें चरित । कामप्रद वाचकां श्रोत्यांसी ।।८७।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि

श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते नहुषचरितं नाम त्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय तिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मुद्गल कथा सांगती । नहुषासी पाच पुत्र होती । देवांसम ते तरल मति । त्यांची नावें ऐकावीं ।।१।। यभ्याति ययाति संयाति । आयति अश्वक पाचवा जगतीं । ययातीची त्यांत महती । त्याचे चरित्र तुज सांगेन ।।२।। शुक्राचार्यांची सुता । देवयानी त्याची कांता । वृषपर्वा राजाची दुहिता । शर्मिष्ठा ही दुसरी पत्नी ।।३।। यदु तुर्वस नामें ख्यात । देवयानीचें दोन सुत । द्रुह्य अनु पुरु सुत । शर्मिष्ठेसी तीन झाले ।।४।। ज्येष्ठ पुत्रांचा करून अतिक्रम । पुरूस राज्याभिषेक उत्तम । कनिष्ठ असुन पितृवाक्य परम । वंदनीय जया झालें ।।५।। दक्ष विचारी मुद्गलाप्रत । ययाती कां करीं ऐसें विपरीत । तें सर्व सांगावें मजप्रत । योगींद्रा आपण आदरें ।।६।। मुद्गल म्हणती दक्षाप्रत । वृषपर्वा दैत्याधिप ख्यात । त्याची पुत्री शर्मिष्ठा असत । महाभाग अतिप्रिय ।।७।। शुक्राची सुता देवयानी । एकटीच लाडकी असोनी । तीही लाड करोनी । वाढविली होती तयानें ।।८।। एकदा शर्मिष्ठा सख्यांसहित । खेळत होती राज्यवाटिकेत । हर्षयुक्त अति चित्तांत । तेव्हां देवयानी तेथ आली ।।९।। देवयानी सहित खेळत । नानाविध क्रीडा कन्यका समस्त। नंतर त्या सर्व श्रमसंयुक्त । स्नानार्थ गेल्या त्वरित । कूपाच्या काठावर ठेवित । आपापली वस्त्रें त्या ।।१०।। विवस्त्र जलक्रीडा करून । शर्मिष्ठा प्रथम बाहेर येऊन । संभ्रमें नेसली देवयानीचे वसन । नंतर आली देवयानी ।।११।। आपुलें वस्त्र शर्मिष्ठा नेसली । हें पाहून ती क्रुद्ध झाली । राजपुत्रीस उपरोधें म्हणाली । मर्मभेदक निंदावचन

।।१२।। मी ब्राह्मणाची पुत्री असत । कां नेसलीस मम वस्त्रें पुनीत । कुत्री पवित्र वस्तूस स्पर्शत । तैसें महादुष्टें तूं केलें ।।१३।। ब्राह्मणांचे राजन्य असत । द्वारपाल ऐसें शास्त्र सांगत । ऐशा राजन्याची सुता अपुनीत । अयोग्य अससी सर्वदा ।।१४।। ऐशा नानाविध वाक्यें निंदित । देवयानी शर्मिष्ठेप्रत । तेव्हां होऊन कुपित । प्रती वचन देती झाली ।।१५।। दुष्टे माझ्या सान्निध्यांत । काय बढाई तूं मारित । राजप्रासाद संसर्गें होत । ब्राह्मण सन्माननीय जगीं ।।१६।। आमच्या प्रसादें तुज लाभत । अन्न वस्त्रादिक समस्त । माझेंच अन्न खाऊन गर्वित । कावळी स्पर्श करी जणु बळीस ।।१७।। ऐशी नानाविध वाक्यें करित । निर्भत्सना ती नंतर लोटित । एक जलरहित विहिरींत । देवयानीस शर्मिष्ठा ।।१८।। सख्यांसहित परत जात । होउनी मनीं अति दु:खित । देवयानी त्या कूपांत । अंधारांत राहिली ।।१९।। दैवयोगें तेथे येत । ययाति नृप मृगयासक्त । देवयानीस कूपांत पाहत । करुणा आली तयासी ।।२०।। आपुला उजवा हात आधार देऊन । देवयानीस वरती काढून । परतू लागला राजा प्रसन्न । देवयानी तैं त्यास म्हणें ।।२१।। देवयानी हर्षसमन्वित । म्हणे नृपा माझा कर करांत । घेतलास आतां वृत्तान्त । सर्व सांगावा आपुला ।।२२।। तेव्हां महीपाल तिज म्हणत । वरवर्णिनी ऐक वृत्तान्त । नाहुष क्षत्रवंशांत । ख्यात ययाती नामें मीं ।।२३।। मृगयेसाठीं वनांत । आलों होतों तैं अवचित । जाहलें दर्शन तुझें मजप्रत । आता जाई स्वगृहीं तूं ।।२४।। मीही जाईन स्वगृहाप्रत । तेव्हां देवयानी म्हणे हर्षित । प्रजानाथा मी शुक्रसुता ख्यात । माझा पति होई तूं ।।२५।। मी विशेष बुद्धीनें स्वीकारला । माझ्या हातांत कर तुझा भला । तुझ्या विना जगतीं मजला । अन्य कोणी प्रिय न होईल ।।२६।। तिचें हें वचन ऐकून । ययाति म्हणे मी क्षत्रिय म्हणून । ब्राह्मण कन्या तूं शुक्रसुता

महान । कैसा वरूं तुजला मीं? ।।२७।। तेव्हां देवयानी तयास म्हणत । कचाचा शाप मज असत । ब्राह्मण पति जीवनांत । मजला मिळणें असंभव ।।२८।। म्हणोनी होऊन भयहीन । मज स्वीकारी तूं प्रसन्न । राजसत्तमा मी सांगेन । शुक्राचार्यांसी निश्चय माझा ।।२९।। बाबांची आज्ञा घेऊन। पत्नी तुझी मी होईन । तिची विनंती मान्य करून । नृप परतला स्वनगरासी ।।३०।। ययाती महाभाग परतत । जरी आपुल्या राजधानींत। देवयानी त्याच स्थळीं राहत । तेथ कोणी नर येई ।।३१।। त्यास विनवी शुक्राचार्यांप्रत । माझा निरोप पोचवा त्वरित । तुमची पुत्री देवयानी सांप्रत । मुनींद्रा कूपाजवळ आहे ।।३२।। ती घरीं न येणार । महामते हा तिचा निश्चय उग्र । शुक्रासी सांगे तो नर । देवयानीचा हा निरोप ।।३३।। तो ऐकतां मुनींद्र त्वरित जात । जेथ देवयानी होती वनांत । देवयानी खिन्न रडत । प्रियसुतेचें सांत्वन करी ।।३४।। सुविव्हल ती सर्व वृत्तान्त । पित्यास सांगे त्वरित । तो ऐकून अत्यंत कुपित । काव्य गेला वृषपर्व्याजवळी ।।३५।। वनवासार्थ उल्बणा वृत्तियुक्त । आनंदानें निर्णय घेत । दैत्याधिप तैं फार दु:खित। ऐकून सारा वृत्तान्त ।।३६।। शुक्राचार्याजवळीं जात । महामुनीस त्या वंदित । धावत जाऊनी शुक्र सदनाप्रत । वृषपर्वा तो दैत्याधिप ।।३७।। म्हणे भक्तिसंयुक्त वचन । दैत्यनायक तो विनीतमन । गुरो तुमच्या अधीन । माझें राज्य तसा देह ।।३८।। मुनिसत्तमा मज सोडून । कोठे जाण्यास उद्यत मन । मींही राज्यादिकाचा त्याग करून । राहीन तुमच्या सन्निध ।।३९।। त्याची ती प्रार्थना ऐकून । शुक्र देवयानीस वनीं जाऊन। म्हणे राजकन्येस क्षमा करून । क्रोध आपला सोडून देई ।।४०।। शर्मिष्ठेचा अपराध असत । परी त्यास्तव दैत्यराज क्षमा मागत । आता हट्ट सोडून स्वसदनाप्रत । परतण्या संमति देई तूं ।।४१।। देवयानी तें

ऐकून म्हणत । मनीं क्रोध समन्वित । मी न परत येईन नगरींत । देहत्याग परी करीन ।।४२।। शोकसंकुल काव्य सुतेप्रत । म्हणे काय इच्छिसी सांग त्वरित । त्याचा उपाय करीन निश्चित । संशय नको तुझ्या मनीं ।।४३।। जें कांहीं तुझ्या मनी । तें सांग मज देवयानी । जरी पुरवाल म्हणे इच्छा मानुनी । तरी मी प्रसन्न होईन ।।४४।। शर्मिष्ठा आपुल्या सख्यांसहित । होईल दासी माझी विनीत । हें जरी वृषपर्वा मान्य करित। तरीच मी परत येईन ।।४५।। ताता, जेथ मज विवाहीं द्याल । तेथे ती माझ्यासवें येईल । सतत माझ्या दास्यांत राहील । ऐसी अट माझी असे ।।४६।। ही अट मान्य असत । तरीच दैत्याधिपाच्या नगरांत । येईन मी आनंदें परत । जाऊन विचारा तयासी ।।४७।। पुत्रीवरी स्नेह अत्यंत। म्हणोनी शुक्र तें मान्य करित । दैत्यराजासी सांगत । देवयानीनें जें मागितलें ।।४८।। दैत्याधिप तें मान्य करित । राज्य रक्षणाचा हेतु मनांत। तेव्हां देवयानी परत जात । प्रसन्न होऊन चित्तांत ।।४९।। शुक्राचार्य विधानपूर्वक देत । नाहुष ययातीस विवाहांत । आपुली सुता आनंदांत । शर्मिष्ठा अर्पिली तिज दासी ।।५०।। ययाती देवयानीसहित । परतला राजधानींत । शर्मिष्ठा त्यांसी सेवित । ऐसा समय कांहीं गेला ।।५१।। तदनंतर शर्मिष्ठा ऋतुयुक्त । एकदा एकटी होती वाटिकेंत । तेथ ययाती राजा येत । दैवयोगें त्या वेळीं ।।५२।। त्यास शर्मिष्ठा विनयान्वित । म्हणे देवयानीनें वरिलें तुज जगांत । मीही मनोभावें निश्चित । वरिले पति म्हणोनि तुला ।।५३।। मी तिची दासी असत । तुम्ही स्वामी माझेही जगांत। मी ऋतुयुक्त कामातुर प्रार्थित । भक्तिपूर्वक मज स्वीकारा ।।५४।। नाहुष ययाती तें मानित । गुप्तपणें तिज भोगित । देवयानीस तें वृत्त अज्ञात । होतें दक्ष प्रजापते ।।५५।। परी निसर्ग आपुलें काम करित । शर्मिष्ठा गर्भवती होत । तें पाहून मुनिसुता विचारित । देवयानी

तिजप्रती ।।५६।। कोणाचे वीर्य उदरांत । वाढविसी तें सांग मजप्रत । दैत्यराजासी लांछन असत । अथवा दैवयोगें हें घडलें ।।५७।। शर्मिष्ठा तिज खोटें सांगत । मी न केलें लांछनयुक्त । कर्म कांहीं या जगांत । गुप्तपणे ब्राह्मण एक सेविला ।।५८।। त्या ब्राह्मणाचें महावीर्य उदरांत । गुप्तभावें मी वाढवित । देवयानीस तें मान्य होत । पुढें पुत्र झाले शर्मिष्ठेस ।।५९।। ते सर्व देवसम शोभत । राजा शर्मिष्ठेस नित्य भेटत । वाटिकेंत गुप्तपणें भोगित । ऐसे चाललें बहुकाळ ।।६०।। परी एकदा तदनंतर जात । देवयानी त्या वाटिकेंत । तेथ मुलांसवें ययातीस पाहत । जे त्यास पिता म्हणती ।।६१।। तें ऐकून अत्यंत क्षुभित । देवयानी उमजली सर्व वृत्तांत । क्रोधवश ती गृहीं परतत । ययाती तिचें सान्त्वन करी ।।६२।। देवयानी शुक्राकडे जात । राजर्षि भयाकुळ चित्तांत । असमर्थ तिज आणण्या परत । शुक्रास समजली सर्व घटना ।।६३।। तेव्हां अत्यंत तो कुपित । ययातीस शाप देत । वार्धक्य येईल तुजप्रत । ययाती तत्क्षणी वृद्ध झाला ।।६४।। उशनस शुक्राप्रत जाऊन । शोकसंतप्त बोले वचन। श्वशुरा अतृप्त माझें मन । कामभोगार्थ लालसा प्रबळ असे ।।६५।। तरी वार्धक्यनाशाचा उपाय । सांगा आपण सदय। न स्पर्शीन देवयानीशिवाय। कोणीही स्त्री यापुढें मी ।।६६।। तें वचन ऐकून संतोषयुक्त । शुक्राचार्य तयास सांगत । महाभागा तुझे सुत । सांप्रत यौवनयुक्त जे असती ।।६७।। त्यांना हें वार्धक्य देऊन । तू लाभशील पुनरपि यौवन । जो पुत्र स्वीकारील वार्धक्य प्रसन्न । त्या पुत्रा राज्याधिकार देई ।।६८।। ऐसें करिता दोष न लागेल । ऐसा हा उपाय सबळ । तो मानून मनीं विव्हल । देवयानीसह परत गेला ।।६९।। स्वनगरांत जाऊन । ज्येष्ठ पुत्रांस सांगे वर्तमान । म्हणे माझें वार्धक्य स्वीकारून । यौवन कोण मज देईल? ।।७०।। परी मूर्खभावें

कोणी न मानित । ज्येष्ठ पुत्र ते भययुक्त । परी कनिष्ठ सुत पुरू स्वीकारित । वृद्धत्व आपुल्या पित्याचें ।।७१।। ययातीस यौवन लाभत । पुरु तत्क्षणीं वृद्ध होत । शुक्र वरदानें न लागत । दोष ययाती नृपासी ।।७२।। पुरूसी राज्यपद आश्वासित । ययाति अनेक भोग भोगित । मनीं जाहला बहु तृप्त । तीर्थयात्रा बहुत केल्या ।।७३।। महाभाग तो यज्ञ करित । सांगोपांग समस्त । द्रव्य सारें कोशगत । भूषणादीही दान देई ।।७४।। ब्राह्मणांसी दान देत । राज्यकोश झाला रिक्त । तेव्हां गालव मुनी तेथे येत । ययातीसी भेटतसे ।।७५।। मातीची भांडीं घरांत । ययातीच्या होतीं व्यवहारांत । ऐशा धनहीन स्थितींत । गालव याचना करी त्यास ।।७६।। खेदसंयुत त्यास म्हणत । म्हणे नृपा मी आलों तुजप्रत । गुरुदक्षिणा देण्या अशक्य । तुझें साहाय्य मागतसे ।।७७।। श्यामकर्ण अश्व सहस्र मागत । माझा गुरु मजप्रत । गुरुदक्षिणा न देता तयाप्रत । मज कैसी मुक्ति मिळे? ।।७८।। तूं श्रेष्ठ सकल नृपांत । म्हणोनि मी हें याचित । गुरुदक्षिणा देण्या जगांत । समर्थ मजला तूं करावें ।।७९।। ययाती आपुली कन्या देत । माधवी नामक तयाप्रत । त्या मुलीच्या साहाय्यें होत । मनोरथ पूर्ण गालवाचें ।।८०।। तदनंतर तो राजशार्दूल घेत । यौवन देऊन वार्धक्य परत । पुरूस राज्यपद अर्पित । तुर्वसूस पाठवी दक्षिण पूर्वेला ।।८१।। यदूस दक्षिण पश्चिम दिशेंत । ययाती करी नियुक्त । वायव्य दिशेचा स्वामी नेमित । द्रुह्यु नामक पुत्रासी ।।८२।। त्या पुत्रांनी ही पृथ्वी समस्त । जिंकून पाळिली धर्मयुत । सर्वत्र सार्वभौमत्व लाभत । पुरू राज्य करीतसे ।।८३। तो धर्मयुक्त विनीत । सत्यसंध प्रतापवंत । ययाती जाई वनांत । उत्तम तप करीतसे ।।८४।। अन्तीं जात स्वर्गांत । नाना भोगयुक्त जो लोक असत । तेथ ऐसा उत्तम भोग भोगित । सर्वांहून विशेष भावें ।।८५।।

माझ्या सम पुण्यभोग भोगित । ऐसा अन्य न कोणी या स्वर्गांत । ऐसा गर्व चित्तांत । उपजला त्या ययातीच्या ।।८६।। तेव्हां इन्द्र तया विचारित । कोणतें महत्पुण्य केलें जीवनांत । ते सांगावें मजप्रत । नरशार्दूला मोह तैं झाला ।। ८७।। तो इंद्रासी गर्वे सांगत । माझ्या पुण्याची गणना नसत । स्वर्गांत हे जे देव स्थित । त्यांचें पुण्य न अल्पांशही ।।८८।। माझे पुण्य अतुलनीय असत । माझ्यासम पुण्यकर कोणी नसत । त्याचें हे वचन ऐकून म्हणत । इंद्र तेव्हां ययातीसी ।।८९।। महाराजा ह्यांचा पुण्यप्रभाव अज्ञात । तुज म्हणोनी ऐसें म्हणत । तूं मोह समन्वित । आपुली आपण स्तुति करिसी ।।९०।। स्वप्रशंसा तूं करित । आपुलें पुण्य मुखें उच्चारित । म्हणोनी तें पुण्य समस्त । नष्ट झालें नृपा तुझें ।।९१।। आतां महीपृष्ठीं पुन्हा जाऊन । करी तपाचें अनुष्ठान । ययाती दुःखयुक्त मन । स्वर्गभ्रष्ट जाहला ।।९२।। भूपृष्ठीं तो पडत । तें शिबिमुख्य नातू पाहत । मातामहास जाणून अर्पित । आपुलें पुण्य तयासी ।।९३।। त्याच्या पुण्ययोगें स्वर्गांत । पुनरपी ययाती जात । देवासम तो विराजत । मोद मानसीं बहु त्याच्या ।।९४।। तदनंतर नारद योगी तयाप्रत । एकदा म्हणे करुणायुत । पुण्यविनाशकर विघ्न तुजप्रत । कष्ट कारण झालें असें ।।९५।। विघ्नेशासी जरी भजसी । तरी अन्तीं स्वानंदलोकीं जासी । अन्यथा भूलोकपतन तुजसी । निःसंदेह लाभेल ।।९६।। ययाती नारदासी विनवीत । तेव्हा दशाक्षर गणेशमंत्र देत । नारद त्या ययातीप्रत । जप करी तो भक्तिभावें ।।९७।। गणेशाचें ध्यान करित । पूर्वपुण्य जेव्हां झाले समाप्त । राजेंद्र शुक्लगतीनें जात । गणेशलोकीं सत्वर ।।९८।। गाणपत्य महायश ययातीचें चरित । संक्षेपें तुज कथिले पुनीत । जो श्रवण करील तयाप्रत । इच्छापूर्तीचें साधन ।।९९।। ओमिति श्रीमदान्त्ये

पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते ययातिचरितं नामैकत्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकतीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मुद्गल कथाभाग पुढें सांगती । यदूचे चार पुत्र असती । देवसन्निभ ते समस्त असती । सहस्रजित् हा ज्येष्ठ पुत्र ।।१।। त्याचा सुत शतजिन्नाम असत । तयास झाले तीन सुत । हिहय, हय वपुर्हय नामें ख्यात । हिहयाचा पुत्र धर्म होता ।।२।। त्याचा सुत नेत्र ख्यात । कुंति तयाचा पुत्र ज्ञात । सोहंजि त्याचा सुत । त्याचा पुत्र महिष्मान् नाम ।।३।। माहिष्मती नगरी तो वसवित । त्याचा पुत्र भद्रसेन ख्यात । दुर्मद त्याचा पुत्र विख्यात । धनक हा श्रीमंत अन्य होता ।।४।। धनकाचे चार सुत विश्रुत । कृतवीर्य, कृताग्नी, कृतवर्मा नामयुक्त । कृतौजा हा चौथा असत । दक्षा तेथ ज्येष्ठ प्रतापी ।।५।। कृतवीर्य दानशील महीपति । कृष्ण चतुर्थी ख्यात करी जगतीं । प्रजापाला दक्षा ती । स्वर्गाहूनही सर्व शुभप्रद ।।६।। दक्ष तेव्हां विचारित । ही कथा सांग मजप्रत । त्या राजानें भूमंडळात । कैसीं रूढ केली कृष्ण चतुर्थी ।।७।। हें ऐकून कथामृत । माझ्या हृदयीं हर्ष वाढत । म्हणोनी विस्तारश: समस्त । सांगा तुम्हीं कथानक ।।८।। मुद्गल तेव्हां सांगती । अद्भुत कथा ती तयाप्रती । माहिष्मती महापुरी जगतीं । तेथ अंत्यज भीमनाम ।।९।। तो द्रव्यलुब्ध पापकर्मरत । तो वाटमारीचा धंदा करित । प्रत्येक दिवशीं लोकांसी मारित । पशुहत्या निरंतर करी ।।१०।। मांसविक्रय तो करित । अति क्रूरपणें लोकांस मारित । एकदा माघमास कृष्णपक्षांत । चतुर्थी तिथि पवित्र होती ।।११।। त्या दिवशीं वनान्तरांत । महापर्वतावरी भीम संचार करित । जनांचा वध करण्या उद्युक्त । दैवयोगें कोणी तेथ न

आला ।।१२।। तेव्हां अन्नजलविहीन । भटकला तो इतस्तत: उन्मन । सूर्य अस्तासी जाता गमन । गृहाप्रती करूं लागे ।।१३।। मार्गी तो दुष्ट पाहत । बारा ब्राह्मण अवचित । त्यांसी ठार करून लुटित । सर्वस्व त्यांचें निर्घृणपणें ।।१४।। घरीं जाऊन क्षुधार्त । भोजन करी चंद्रोदय होतां त्वरित । त्याचा पुत्र गणेशनामक असत । हाक त्यासी मारिली ।।१५।। नंतर पुन्हां एकदा पाप भयंकर । घडलें त्या अंत्यजहस्तें उग्र । कृष्णपक्षीं चतुर्थी असता व्यग्र । मृत्यु त्यास ये चंद्रोदयीं ।।१६।। गणेशदूत विमानांतून येऊन । कैलासीं त्यास जाती घेऊन । गणपस्थानीं पोहचवून । गौरव त्याचा बहु करिती ।।१७।। स्वर्गमार्गांत स्तुति करिती । ब्रह्मा विष्णू आदी प्रीती । विमानसंचारी पूजिती । भीम नामक त्या अंत्यजासी ।।१८।। नंतर शिवलोकांत । भोगून भोग हृदयेप्सित । पृथिवीतलावरी पडत । पुनरपि तो अंत्यज ।।१९।। माहिष्मती नगरींत । धनक राजा विख्यात । त्याचा तो सुत होत । कृतवीर्य नामें ख्यात ।।२०।। नानाधर्मपरायण होत । देव विप्र अतिथींस पूजित । यज्ञ करी भक्तियुत । परी त्यास पुत्र नसे ।।२१।। कृतवीर्य प्रतापवंत । पुत्रलाभार्थ प्रयत्न करित । नाना दानधर्म आचरित । परी संतती न लाभली ।।२२।। तेव्हां तो राजा अतिदु:खित । प्रधानावरी राज्य सोपवित । निष्कंटक राज्य असत । सपत्नीक वनीं गेला ।।२३।। तेथे तो तपश्चर्येत । पूर्वसंस्कारें गणेशासी चिंतित । नाना तपें आचरित । परी न लाभे संतती ।।२४।। प्राण आणोनी नेत्रांत । पुत्रासाठीं आतुर होत । अस्थि त्वचा समायुक्त । प्रजानाथ कृतवीर्य ।।२५।। दैवयोगें तेथ येत । नारदमुनि त्या वनांत । त्या कृतवीर्या पाहून परतत । स्वर्गांत कांहीं योजूनी ।।२६।। कृतवीर्याचा पिता असत । धनक नामा स्वर्गात । त्यास वृत्तान्त समग्र सांगत । कृतवीर्य पुत्राचा ।।२७।। अरे धनका तुझा सुत ।

पुत्रार्थ तप करी वनांत । केवळ अस्थिपंजररूपें असत । नाना यत्न त्यानें केलें ।।२८।। संतती त्यास अल्पकाळांत । न होतां होईल दिवंगत । पुत्रहीनास गति काय लाभत । तें सांग धनका तूं ।।२९।। धनकास ऐसें सांगून । नारद कैलासीं करित गमन । धनक विचार करी उन्मन । पुत्रा सहाय्य कैसें करूं ।।३०।। सर्वज्ञ ब्रह्मदेवासी शरण जाता । ईप्सित सिद्ध होईल तत्त्वता । यांत संदेह लव न वाटे चित्ता । त्या धनकाच्या त्या वेळीं ।।३१।। ऐसा विचार करून जात । धनक तो ब्रह्मदेवाप्रत । नाना स्तोत्रें त्यास स्तवित । विनयपूर्वक म्हणे त्यासी ।।३२।। माझा पुत्र धर्मशील असत । परी त्यास पुत्र नसत । पुत्रलाभार्थ प्रयत्न करित । नाना व्रतें करूनियां ।।३३।। राज्यादिक सारें सोडून । तप करी वनांत जाऊन । अस्थिपंजर देह होऊन । मरणोन्मुख तो जाहलासे ।।३४।। कोणत्या उपायें सुत । होईल तयासी तें मजप्रत । सांगावें ब्रह्मदेवा त्वरित । कळवीन मी तें तयासी ।।३५।। तेव्हां तयासी चतुरानन । सांगे संतुष्ट होऊन वचन । द्विजहत्यादी पापें घडून । पूर्वजन्म बिघडला त्याचा ।।३६।। पुन्हा तयासी विधि सांगत । देव जो सर्वार्थ जाणत । पुत्रप्राप्तीचा उपाय निश्चित । सर्वसिद्धिप्रद जो असे ।।३७।। तुझ्या सुतानें संकष्टीचें व्रत । साधिलें पूर्वी नकळत । संकष्टी दिवशी जें केलें असत । तें महापाप नष्ट न होय ।।३८।। महापापें अन्य नष्ट होती । परी कृष्ण चतुर्थीस जीं घडतीं । त्या पापांतून न मिळे मुक्ति । अक्षय तीं राहतात ।।३९।। म्हणोनी कृष्ण चतुर्थी असत । तेव्हां पुण्यच आचरावें जगांत । तुझा पुत्र राजेंद्र विनाशित । ब्राह्मण बारा त्याच दिवशीं ।।४०।। तें महापाप असे संचित । नाना तपांनी तें न लुप्त । व्रततीर्थादिक समस्त । यज्ञादि असमर्थ तें फेडण्या ।।४१।। संकष्टी दिनी जें घडत । तें पाप वज्रलेप होत । तें दूर करण्या उपाय नसत । तथापि ऐसे करी तूं

।।४२।। पुण्य चतुर्थी संकष्टी साधित । त्याला जन्मादिक न उरत । चतुर्विध हें जग समस्त । मायामय जाणावें ।।४३।। तें जीवांसी संकट असत । मोहमग्न त्यांत भ्रमत । चतुर्थी व्रत जो आचरित । चतुर्विध कष्ट नष्ट त्याचें ।।४४।। ब्रह्मभूत होऊन स्वानंदात । ब्रह्मांत तो वर्तत । व्रतप्रभावें इहलोकांत । सुखप्राप्ति नरांसी ।।४५।। जे चतुर्थी दिनीं पाप करित । तयांसी मुक्ति न लाभत । अन्य पुण्यप्रभावें स्वर्गापर्यंत । झेप असे तयांची ।।४६।। स्वर्गवास उपभोगित । परी पुण्य जेव्हां होत समाप्त । तेव्हां पुन्हा भूलोकीं जन्मत । पाप फळें भोगिती ।।४७।। पापें भोगून नष्ट होत । तेव्हां ते गाणपत्य पुनीत । या न्यायें गणेशदूत । अंत्यजास एका घेऊन गेले ।।४८।। पूर्वी जो होता पापी बहुत । परी संकष्टी व्रत घडलें नकळत । म्हणोनी कैलासीं त्यास नेत । प्रथम भोगण्या पुण्यफल ।।४९।। नंतर तो अंत्यज जन्मत । पुत्ररूपें तुझ्या घरांत । पाप भोगण्या समस्त । म्हणोनी तयासी अनपत्यता ।।५०।। चतुर्थीस जें पाप घडत । तें चतुर्थी व्रत नष्ट करित । म्हणोनी नेमें चतुर्थी व्रत । करिता तो पापमुक्त ।।५१।। पाप सारें जाऊन । पुत्रयुक्त तो होऊन । सुखमय होईल जीवन । यांत संशय कांहीं नसे ।।५२।। जेवढें घडलें पापकर्म जगांत । तें दूर करण्या पुण्यसंचित । करिता नष्ट होतें दुरित । गजाननाच्या कृपाप्रभावें ।।५३।। ह्या कारणें बारा संकष्ट्या करील । तरी तें पाप जाईल । बारा विप्रांच्या वधोद्भव । ऐसें जाण तूं धनक नृपा ।।५४।। नंतर होऊन करुणायुक्त । संपूर्ण व्रतविधि त्यास सांगत । विधीचें वचन ऐकून जात । धनक राजा स्वस्थानीं ।।५५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते धनकस्य व्रतोपदेशो नाम द्वात्रिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय बत्तीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । मुद्गल दक्ष प्रजापतीस सांगती । धनक झाला हर्षित चित्तीं । व्रताचा विधि पुस्तकांत प्रीतीं । लिहून नेई पुत्र स्वप्नांत ।।१।। कृतवीर्याच्या स्वप्नांत । धनक जाई तेव्हां त्वरित । पित्यास पाहून प्रणाम करित । राजा तयासी उठवीत करीं ।।२।। नंतर आलिंगून मांडीवर । बैसवोनी सांगे समग्र वृत्तान्त । घडला जो हितकर । आपुल्या पुत्रास स्नेहानें ।।३।। मुला तूं नानाविध यत्न करित । पुत्रलाभार्थ श्रद्धायुक्त । परी तुज यश न लाभत । आता ऐक माझें वचन ।।४।। माझ्या आज्ञेवरून व्रत । आचरण करी तूं भक्तियुत । त्या पुण्यें तुज निश्चित । पुत्र होईल कृतवीर्या ।।५।। ब्रह्मदेवें मज सांगितले । तें व्रत मीं ह्या पुस्तकीं लिहिलें । तें तुज देण्या आणिलें । स्वीकार करी सत्वर ।।६।। ऐसें सांगून पुस्तक देत । धनक नंतर होत अंतर्हित । कृतवीर्यास जाग येत । करांत पुस्तक पाहतसे ।।७।। तेव्हां मनी होत विस्मित । तैसाचि तो प्रहर्षित । पित्याच्या स्मृतीनें दुःखित । रोदन करी मायावश ।।८।। सपत्नीक तो परत जात । जेव्हां नंतर स्वनगरांत । तेव्हां प्रधानादि करिती स्वागत । प्रजाजन सम्मानिती ।।९।। तदनंतर ब्राह्मणांसी बोलावून । सांगे राजा वृत्तान्त महान । ब्राह्मणां त्या प्रणाम करून । पुस्तक तें त्यांस दाखवी तैं ।।१०।। पुस्तक तें अद्भुत । आणून दिलें जें जनकें स्वप्नांत । वाचून ब्राह्मण सांगत । राजा हें पुस्तक अपूर्व ।।११।। उत्तम व्रत वर्णिलें ह्यांत । सर्व संकष्टहारक निश्चित । सर्वप्रद जें कृष्ण चतुर्थीस पुनीत । आचरावें चंद्रोदयीं ।।१२।। सिद्धिदायक गणेश । जो ख्यात असे विघ्नेश । पुजून तो जगदीश । नंतर अर्घ्य तिथीस द्यावे ।।१३।। गणेशास चंद्रास देत । व्रतकर्ता अर्घ्य भक्तियुत । सूर्योदयापासून ध्यात ।

गणेशास मनोभावें ।।१४।। जलपानादी वर्ज करून । चंद्रोदयापर्यंत पुजून । नंतर चंद्रास अर्घ्यदान । सात वेळा नृपा द्यावें ।।१५।। ब्राह्मण पूजन तदनंतर । सपत्नीक त्यांचा योग्य आदर । करून भोजन करावें ।।१६।। शर्करायुक्त खीर मधुर । भोजनांत त्यास द्यावी रुचिर । नंतर मित्रांसवे समग्र । स्वयं भोजन करावें ।।१७।। विप्रांसी द्यावें दान । सुवासिनींस कंचुकादी प्रदान । त्यानंतर जागरण करून । गणेशस्तुति मोदें गावी ।।१८।। पंचमी तिथीची प्रभात । होतां स्नानादि कर्मे करित । पूर्ववत् गणेशासी पूजित । भोजन प्रसाद तया दाखवी ।।१९।। ब्राह्मणां पुनरपि भोजन । भूयसी दक्षिणा देऊन । प्रतिमासीं हें नितनेम । संकष्टीव्रत आचरावें ।।२०।। ऐसें आचरता व्रत । सकल संकटें दूर होत । अन्तीं स्वानंदलोकीं जात । अपार महिमा व्रताचा ।।२१।। नृपा तुझ्या योगें लोकांत । व्रत होईल हें ज्ञात । जें कोणासी न ज्ञात । न पाहिलें वा ऐकिलें ।।२२।। लोकांसी उपकारक होईल । चतुर्विध सुख जग पावेल । संकष्टकर व्रते या घडेल । बंधनांचा नाश शीघ्र ।।२३।। अखिल भोग इहलोकांत । दुर्लभ देवभोग्य या योगें लाभत । अन्तीं मुक्ति होत प्राप्त । या व्रताच्या प्रभावानें ।।२४।। ऐसें सांगून आश्रमीं परतत । ब्राह्मण नंतर आचरित । उत्तम तें अपूर्व व्रत । कृतवीर्य राजा श्रद्धेने ।।२५।। नंतर सूत शौनकादीस सांगत । मुद्गल वचनें दक्ष हर्षित । संशय छेदनार्थ विचारित । प्रश्न आपुला तयासी ।।२६।। कृतवीर्यापासून लोकांत । व्रत जाहलें हें ख्यात । तरी भीम अंत्यज आचरित । हें कैंसें शक्य झाले? ।।२७।। कृष्ण चतुर्थी व्रत घडत । भीमअंत्यजहस्तें न कळत । म्हणोनि तो कृतवीर्य होत । ऐसें आपण सांगितलें ।।२८।। तरी भीमें हे व्रत । कैसें आचरिलें हें न समजत । तरी सत्य सांगून संशयमुक्त । करावें मजला मुद्गला ।।२९।। तूं सर्वज्ञ साक्षात् योगीश्वर । माझा संशय

करी दूर । मुद्गल सांगे तयास उत्तर । प्रजापते ऐक महामती तूं ।।३०।। दक्षा पूर्वी गाणेश्वर व्रत । चतुर्थी संज्ञक होतें ख्यात । संकष्टहरण तें ज्ञात । पुरातन तें होतें ।।३१।। पृथ्वीपरि स्वर्गांत । तैसेचि पाताळ लोकांत । हें चतुर्थीव्रत सर्वसंमत । कृतवीर्यामुळे झालें ।।३२।। तोपर्यंत हें व्रत । लोकांत नव्हतें ऐसें ज्ञात । भीमें जें आचरिलें नकळत । चतुर्थी व्रत ऐसें न जाणतां ।।३३।। कृतवीर्यानंतर प्रसिद्ध होत । विशेषें हें व्रत ख्यात । हे सर्व तुज सांगत । कथानक कृतवीर्याचें ।।३४।। हें श्रोत्यांस पुण्यद असत । म्हणोनि ऐक तूं समस्त । तेणें तुजही लाभेल समस्त । मनोवांच्छित दक्षा झणी ।।३५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते कृतवीर्यव्रतप्राप्तिवर्णनं नाम त्रयस्त्रिशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय तेहतीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । एक वर्षभरी आचरित । कृतवीर्य तें उत्तम व्रत । पाप त्याचें लया जात । बारा ब्राह्मण हत्येचें ।।१।। व्रत पुण्य प्रभावें होत । नृपांगना तैं गर्भवती पुनीत । पुण्यवेळीं जन्म देत । तेजस्वी पुत्रास एका ।।२।। परी तो पुत्र हातपायविहीन पाहून । माता करी रुदन । कृतवीर्य नृपही दु:खमग्न । प्रधान सारे सांत्वन करिती ।।३।। तदनंतर शोक त्यागून । राजा करी जातकर्मादी उन्मन । महोत्सव नगरांत घडवून । सान्त्वन करी पत्नीचे ।।४।। रात्रीं दत्तात्रेय योगी येत । त्या नृपाच्या स्वप्नांत । ते त्यास सांगत । तें ऐक आतां दक्षा तूं ।।५।। तुझ्या सुतास बारा वर्षे होत । तेव्हां मी तव सदनीं निश्चित । येऊन करीन अंगयुक्त । हातपाय त्यास देउनी ।।६।। राजेंद्रा तूं चिंता न करी । तुझा ह्या पुत्राची थोरवी । देवमान्य होईल कालांतरी । महातेजस्वी

तो होईल ।।७।। तदनंतर अन्तर्धान होत । योगी दत्तात्रेय त्वरित । राजा जागा होऊन स्मरत । स्वप्न तें हर्षप्रद सारें ।।८।। गणेशासी तो ध्यात । पृथ्वीवरी दवंडी पिटवीत । कृष्णचतुर्थीचे व्रत । करावें सर्व लोकांनी ।।९।। जो हें न करील व्रत । त्यासी मी ठार मारीन निश्चित । म्हणोनी चांडाळादी द्विजपर्यंत । समस्त जन तें आचरिती ।।१०।। आठ वर्षांचें नरनारी करिती । व्रत तें विधिपूर्वक प्रीती । गाणेश्वर कृपाप्रसाद पावती । तेणें कोणा दुःख नसे ।।११।। कोणी स्त्री वंध्या नसत । रोगादींचे भय अज्ञात । ऐसी बारा वर्षे लोटत । तेव्हा प्रकटले दत्त योगीन्द्र ।।१२।। नराधिप त्यांसी वंदित । भक्तिभावें पूजा करित । तेव्हा दत्तात्रेय म्हणत । दाखवी राजा पुत्र तुझा ।।१३।। मी पाहण्या आलों अद्भुत । हातापायाविण बाळ जगांत । तें ऐकतां हर्षित । राजा आणी स्वपुत्रातें ।।१४।। दत्तात्रेयांच्या करीं देत । ते त्यास अंकावरी घेत । योगीन्द्र राजासी म्हणत । राजा व्रत तूं आचरिलें ।।१५।। परी तें व्रत अंगहीन । होतें म्हणून पुत्रास न्यून । हातपायांचे झालें जाण । कोणतें न्यून ऐक तें ।।१६।। व्रताच्या जागरणांत । जांभया दिल्यास तूं सभेंत । जांभयीनंतर न केलेस त्वरित । आचमन तूं तैं पुन्हा ।।१७।। म्हणोनी हें ऐसें घडत । व्रतप्रभावें विष्णु साक्षात। नररूपें हा तव गृहांत । अवतरलासे जाण नृपा ।।१८।। त्याच्या अंशे हा विख्यात । होईल समस्त जगांत । ऐसें बोलून कृतवीर्याच्या सुताप्रत । एकाक्षरमंत्र महामुनी ।।१९।। विधियुक्त गणेशमंत्र अर्पित । त्या कार्तवीर्यास तो पुनीत । द्वादश वर्षांचे अनुष्ठान ख्यात । उपदेशून परतला ।।२०।। दत्तात्रेय होत अन्तर्धान । राजा हर्षला मनोमन । प्रवालक्षेत्रासमीप जाऊन । राजा स्थापित स्वपुत्रातें ।।२१।। व्याघ्रादि हिंस्त्र प्राणी त्या वनांत । जरी होते संचार करित । तरी तो कृतवीर्याचा सुत तप करित । सुदारुण श्रद्धेनें ।।२२।। वारा पिऊन

तो राहत । गजाननास चित्तीं ध्यात । हातपाय विहीन असत । काष्ठवत् झालें शरीर ।।२३।। देहभावातीत होत । तप जेथ तो करित । तें वन निर्वैर होत । गजसिंहादी संचरती ।।२४।। वैरभाव सोडून प्राणी समस्त । फिरती त्या वनांत । ऐसीं बारा वर्षे लोटत । तेव्हां ढुंढी तोषला ।।२५।। परमभाविक त्या भक्ताप्रत । स्नेहानें तो प्रकटत । तलावातून वरती येत । पाहून हर्षला कार्तवीर्य ।।२६।। प्रणाम करून करी पूजन । हर्षें करी त्याचे स्तवन । रोमांच अंगीं दाटून । महायश स्तुति करी ।।२७।। गणनाथासी सर्वादिपूज्यासी । सर्वपूज्यासी हेरंबासी । दीनपालासी ब्रह्मासी । ब्रह्मदात्या तुज नमन ।।२८।। निराकारासी साकाररूपासी । परमात्म्यासी योगासी । योगदात्यासी शांतिरूपासी । सदा ज्ञानघना नमन ।।२९।। कर्ममार्ग प्रवर्तकासी । आनंदासी आनंदकंदरूपासी । रजोगुणें सृष्टिकर्त्यासी । सत्त्वगुणें पालका नमन ।।३०।। तमोगुणें संहारकरासी । गुणेशासी नाना मायाधरासी । नाना मायाविवर्जितासी । मायामायिकासी नमन ।।३१।। स्वानंदपतीसी मोहदात्यासी । सिद्धिबुद्धींच्या वरासी । सिद्धिबुद्धिप्रदात्यासी । लंबोदरा तुज नमन ।।३२।। गणनाथा जेथ वेद थकत । तेथ मी काय स्तवन गात । शिवविष्णु आदी देव समस्त । योगीही जेथ मौन धरिती ।।३३।। ऐसी स्तुति ऐकून म्हणत । गणनाथ त्या भक्तोत्तमाप्रत । वर माग महाभागा त्वरित । कार्तवीर्या मनोवांछित ।।३४।। तूं रचिलेलें हें स्तोत्र जगांत । वाचितां सर्वप्रद होईल निश्चित । अंगहीनास अंगलाभ होत । भावबळें स्तोत्र वाचितां ।।३५।। त्याच्या अंगीं जें जें न्यून । तें तें मी दूर करीन । इहलोकांत भोग लाभून । पुत्रपौत्रादि समवेत ।।३६।। अन्तीं तो नर स्वानंदांत । ब्रह्मभूत विलीन होत । ऐसें वरदान देऊन तयाप्रत । गणनायक कृपा करी ।।३७।। तदनंतर कार्तवीर्य प्रार्थित । हर्षयुक्त तो महाभक्त । भक्तेशा

गणाधीशाप्रत। काय वरदान मागूं मी? ।।३८।। सर्व हें मायामय असत । तुझ्या दर्शनें हें ज्ञात । परी सुहृदांच्या संतोषास्तव मागत । शरीर माझें सुंदर करा ।।३९।। तुझ्या चरणीं भक्ति द्यावी । माझी इच्छा पुरवावी । तुझ्या प्रसादें मज व्हावी । पूर्ण राज्याची प्राप्ति ।।४०।। या क्षेत्रांत स्थिर होऊन । भक्तांसी रक्षी निर्विघ्न । धर्म, अर्थ, काम मोक्ष देऊन । ब्रह्मभूयप्रद करावें ।।४१।। प्रवालमय रूपांत । मी गजानना पाहिला क्षेत्रांत । म्हणोनी प्रवाल नामें ख्यात । होवो नित्य हें क्षेत्र ।।४२।। सदा विजयसंयुक्त । करी मजला सहस्रभुजयुक्त । विष्णुतुल्य पराक्रमी जगांत । दयासिंधो करी मजला ।।४३।। माझें सर्व सेवन । होवो सदा देवासमान । मंत्रादिकांत सिद्धिलाभ महान । मिळो मज तव प्रसादें ।।४४।। माझ्या स्मरणें होवो प्राप्त । जें जें नष्ट गत जगांत । माझ्या सम बलवंत । इंद्रादीही नसावे ।।४५।। तेव्हां गणनाथ तयाप्रत । म्हणे हें सर्व होईल निश्चित । माझ्या प्रसादें समस्त । वांच्छित तुजला लाभेल ।।४६।। माझ्या स्मरणमात्रें सेवाव्रत । मंत्रादींनी आचरित । तरी तुज निर्विघ्नता प्राप्त । राजेंद्रा होय निरंतर ।।४७।। ऐसें वरदान देऊन । गणेश पावले अन्तर्धान । तदनंतर त्याचा देह पूर्ण । अवयव पूर्ववत् जाहले ।।४८।। हजार भूज हजार हात । लाभले तया कार्तवीर्याप्रत । महाबळवंत महावीर्ययुक्त । तेज:पुंज जाहला ।।४९।। देवादींही दर्शनार्थ येत । त्या राजासी भेटत । साक्षात् विष्णु तो प्रकटत । कलांशानें कार्तवीर्य ।।५०।। नंतर द्विजसाहाय्यें स्थापित । गणेश्वर मूर्ति भक्तिसंयुत । राजा त्या क्षेत्रांत । पूजार्थ ब्राह्मण नेमिले ।।५१।। यथाविधि द्विजांस पूजित । भक्तिभावें त्यांस नमत । तेही त्यास वर देत। देव परतले स्वर्गी तैं ।।५२।। इंद्रासहित सर्व देव हर्षित । स्वर्गी उत्सव करित । कार्तवीर्य रथीं बसून जात । आपुल्या नगराकडे तेव्हां ।।५३।।

दूत सांगती वृत्तान्त । तो ऐकतां नागर समस्त । त्याचें स्वागत करण्या जात । आनंद झाला सर्वांसी ।।५४।। प्रधानादी झणीं जात । नगरीच्या द्वाराप्रत । मित्रपरिवार प्रमुदित । स्वागत करिती राजपुत्राचें ।।५५।। समस्त पुर केलें मंडित । नंतर त्यास नेत नगरांत । राजपुत्र प्रवेशून राजसदनांत । प्रणाम करी मातापित्यांसी ।।५६।। तीं मातापितरें मुदित । आशीर्वाद त्यास देत । त्यासंगें राहून सुखित । जाहला कृतवीर्य नृपती ।।५७।। कार्तवीर्यासी बैसवित । राज्यावरी कालोचित । स्त्रीसहित जात वनांत । कृतवीर्य वानप्रस्थाश्रमीं ।।५८।। गणपतीस भजत ध्यात । सस्त्रीक कालांतरें जात । गणेशलोकीं तो पुनीत । प्रजाजन सारे व्रत करिती ।।५९।। तेही क्रमें गणनाथाप्रत । अभेद अन्तीं दक्षा पावत । वाचील ऐकेल कृतवीर्यचरित । चतुर्विध संकट नष्ट तयाचें ।।६०।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते कृतवीर्यचरितं नाम चतुस्त्रिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चौतिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । मुद्गल सांगती कथा पुढती । कार्तवीर्याची अति प्रीति । धर्म नीती राज्य करी जगतीं । कार्तवीर्य पाळी प्रजेसी ।।१।। तदनंतर तो भूप जिंकित । सर्व राजांसी जगांत । सप्त द्वीपवती पृथ्वी भोगित । बलसंयत तो नृप ।।२।। त्याचें नाव सहस्रार्जुन । देवें ठेविलें आदरें करुन । त्याच्या सम क्षात्रमंडळीं जन । अन्य कोणीही न दिसे ।।३।। देवादी झाले भयभीत । जरी हा नृप क्रोधयुक्त । झाला तर स्वर्ग जिंकील क्षणांत । असंख्य सेना तयाची ।।४।। त्याच्या यशें तेजें पुरित । जग झाले समस्त । स्त्री सहित नर्मदा नदींत । एकदा जलविहार

तो करी ।।५।। तेव्हां हजार करांनी थांबवित । नदीचा ओघ तो त्वरित । म्हणोनी नदीचा प्रवाह वळत । रावण जेथ बसला होता ।।६।। शिवलिंग पूजनीं होता सक्त । तेथ जलौघ वाहत । पूजाविधि संपवून क्षणांत । राक्षसाधिप शोध करी ।।७।। म्हणे दूतेशांनो सांगा त्वरित । कोणी वळविला जलौघ या स्थळाप्रत । जाऊन पहा त्वरित । राग त्याचा बहु मजला ।।८।। त्यास मी ठार मारीन । पूजाभंग हा अपराध महान । तेव्हां दूत जाती त्वरा करून । पाहती त्या कार्तवीर्यासी ।।९।। परतून सांगती ते विस्मित । महादैत्या रावणाप्रत । ऐकून तो वृत्तान्त समस्त । रावण क्रोधें निघाला ।।१०।। सहा प्रधानांसहित । रावण जाई क्रोधयुक्त । असुरराज तो प्रतापवंत । जेथ होता सहस्त्रार्जुन ।।११।। रावणास सहसा पाहत । तेव्हां गदा घेऊन करांत । भिजल्या वस्त्रांनी युक्त । लढे तैसाचि सहस्त्रार्जुन ।।१२।। महाघोर गदायुद्ध त्या दोघांत । तेव्हां तेथें जुंपले अद्भुत । गदाघातें करी व्यथित । रावणासी त्या वेळीं ।।१३।। कवचादी रावणाचें फोडित । तेव्हां दक्षा रणांगणांत । रावण पडला विवश दु:खित । सहस्त्रार्जुनें पकडला ।।१४।। पकडून आपुल्या गृहाप्रत । कार्तवीर्य तयास नेत । तेथे नेऊन बांधून ठेवित । सभेमाजीं खेळ करण्या ।।१५।। रावणाची दहा तोंडे पाहत । तें पाहून राजा चेष्टा करित । तेव्हा तेथ पुलस्त्य मुनि येत । गाणपत्य जो महाभागा ।।१६।। त्यास प्रणाम करित । सहस्त्रार्जुन आदरें पूजित । भक्तिभावें भोजन अर्पित। कर जोडून पुढे उभा ।।१७।। मुनि पुलस्त्य त्यास म्हणत । राजेन्द्रा रावणा सोडी त्वरित । माझा तो पौत्र प्रिय मजप्रत । मित्रभावे वाग त्यासवें ।।१८।। सहस्त्रार्जुन तें ऐकत । रावणासी त्वरित सोडून देत । पुलस्त्य आशीर्वाद नृपा देत । अभिनंदून जात स्वगृहीं ।।१९।। ऐसा तो कार्तवीर्य तेजयुक्त । विष्णुतेजें असे युक्त । धर्मशील तो त्याचें चरित।

वर्णन करण्या अशक्य असे ।।२०।। दिग्विजयास तो निघत । तेव्हां समुद्रास ताडित । पादाघातें तैं भयभीत । शीर्ण जाहला सागर ।।२१।। विपुल यज्ञ तो करित । भूयसी दक्षिणा वाटित । स्वाहा स्वधा वषट्कारें तोषवित । देवतादींस कार्तवीर्य ।।२२।। जो द्विज जें जें मागत । तें तें नृप त्यास देत । लोकांसी स्वधर्मरत करित । सदा गणेशभक्ति करी ।।२३।। गाणपत्य त्यास आवडत । तीर्थदेवता अतिथि असत । प्रिय त्या कार्तवीर्याप्रत । मयूरेश क्षेत्रीं तो गेला ।।२४।। तेथ यात्रा तो करित । एक वर्ष क्षेत्री त्याचा निवास असत । ब्राह्मण बोलावून स्थापित । प्रवाळ गणनाथ गणेश मूर्ति ।।२५।। मंत्र कोविद विप्र करिती । प्राण प्रतिष्ठा भावभक्ति । नंतर नृप करी पूजा आरती । नानाविध भावें पूजन करी ।।२६।। गणेशभजनीं आसक्त । तो नृप त्रिलोक कीर्तियुक्त । चतुर्थी व्रत तेजयुक्त । मोहयुक्त अंगाचा ।।२७।। देवादींसही मान्य होत । परम श्रीयुक्त भोगयुक्त । पुढे विसरला सुखासक्त । गजाननासी दुर्दैवें ।।२८।। ब्रह्मज्ञानमदें गणेश मंत्र त्यागून । म्हणे मीच गजानन । कोणास भजू सांगा वंदन । कोणा करूं ऐसे विचारी ।।२९।। तेव्हां तो खल विघ्नयुक्त । सहस्रार्जुन होत । महाभाग तो वृत्तान्त । सांगतों तुज ऐक आता ।।३०।। एकदा सैन्यासवें जात । मृगयेसाठी वनांत । नील वेषधारी होत । सैनिकही तैसेचि ।।३१।। विविध प्राणी तेथ मारित । ते स्वनगराप्रत पाठवित । दूतांकरवी स्वतः फिरत । वनमाजीं इतस्ततः ।।३२।। नंतर महाराज तो अकस्मात । आश्रम उत्तम पाहत । सचिवांसी आपुल्या विचारित । कोणत्या मुनीचा हा आश्रम ।।३३।। ते म्हणती जमदग्नीच्या आश्रमात । आपण आलों सांप्रत । तेव्हां दक्षा तो नृप जात । हर्षभरित मनें मुनिदर्शना ।।३४।। मुख्य सचिवां समवेत । प्रणाम करून हात जोडित । मूनिशार्दूलास

विनवीत । महायश कार्तवीर्य ।।३५।। धन्य माझा जन्म ज्ञान । कुळ मातापिता पावन । तुझ्या अंघ्रियुगाचें झालें दर्शन । धन्य मी एक संसारीं ।।३६।। ते ऐकून मुनिमुख्य देत । आसनादिक नृपाप्रत । शिष्यांकरवी पुजून विचारित । कुशल प्रश्न नृपासी ।।३७।। विष्णुअंशें जो जन्मला । त्या राजसत्तमाचा सत्कार केला । प्रयोजन कारण विचारी तयाला । विनयभावें जमदग्नी ।।३८।। राजा प्रीतियुक्त, दक्षा, म्हणत । मुनिवरा सारें कुशल असत । आपुल्या आशीर्वादें सतत । आनंदानें मी जीवनीं ।।३९।। मृगयासक्त झालें चित्त । म्हणोनि येथ आलों अकस्मात । पूर्व पुण्यबळें लाभलें अवचित । मुनिसत्तमा आपुलें दर्शन ।।४०।। सर्वांसह महाभागा पुनीत । तुमच्या दर्शनमात्रें होत । आता आज्ञा द्यावी सांप्रत । परत जाण्या स्वनगरासी ।।४१।। सैन्यासहित महामते परतेन । संतुष्ट झालें माझें मन । तुझ्यासम योगांत वा तपांत समान । मजला अन्य दिसेना ।।४२।। मुनिमुख्य हर्षभरित । तेव्हा कार्तवीर्यास म्हणत । विष्णूचा तूं अंश प्रख्यात । आलास भाग्यें आश्रमीं ।।४३।। सांप्रत असे माध्यान्हकाळ । म्हणोनि प्रार्थी मी तुज प्रेमळ । अन्नप्रसाद काही भक्षून निर्मळ । नंतर जाई स्वनगरासी ।।४४।। राजा म्हणे प्रणाम करून । वनांत भुकेलें असे सैन्य महान । त्या सर्व सैनिकांस सोडून । एकटा भोजन कैसें करू? ।।४५।। सर्वांसी भोजन देण्यास नसत । शक्ति मुनिसत्तमा तुझ्यांत । म्हणोनि विनवी तुजप्रत । आज्ञा देई परतण्या ।।४६।। योगीन्द्रा मीं सैन्यासहित । स्वनगरासी परतेन त्वरित । राजशार्दूलास तैं जमदग्नी सांगत । राजेंद्रा चिंता करू नको ।।४७।। तुझ्या सर्व सैन्यासहित । भोजन देईन तुज त्वरित । माझ्या ब्रह्मांडमंडळ वश असत । तपप्रभावें सर्वदा ।।४८।। तरी आतां सैन्यासहित । स्नानार्थ जावें नदीतीराप्रत । सहस्रार्जुन होवोनि विस्मित । प्रणाम करून स्नानास

गेला ।।४९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुरणोपनिषदि श्रीमन्मौद्गलै महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते सहस्त्रार्जुननिमंत्रण नाम पंचत्रिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पस्तीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । कार्तवीर्य राजा स्नानार्थ जात । नंतर जमदग्नी म्हणे रेणुकेप्रत । भोजन देण्या सेनेसहित । नृपास निमंत्रण केलें असे ।।१।। तेव्हां ती उभयता स्मरती । कामधेनू स्वचित्तीं । ती येता त्यांच्यापुढती । पूजा करूनी प्रार्थिती तिला ।।२।। कार्तवीर्य नृप सेनेसहित । भोजनार्थ निमंत्रित । आतां कल्याणी कर तूं त्वरित । व्यवस्था त्यांच्या भोजनाची ।।३।। त्यांची प्रार्थना ऐकतां । कामधेनू रची स्वप्रभावता । परिवलयांकित महापूर तत्त्वता । निर्मिला चतुर्विध अन्नाचा ।।४।। पाकशालिका निर्मिली क्षणांत । ती पाहून मुनी हृष्ट मनांत । शिष्यांस पाठवून बोलवित । सेनेसहित नृपासी तैं ।।५।। म्हणे त्वरा करावी आतां । झाली सर्व अन्नाची सांगता । तदनंतर नानाविध अन्नें तत्त्वता । सर्वांस भोजन दिलें मुनीनें ।।६।। अमृत कल्परूप तें भोजन । जेऊन सर्वांचे तृप्त मन । फलकंदादी मुखशुद्धि लाभून । तांबूल भक्षण मग करिती ।।७।। नंतर वस्त्रादिकांनी सत्कृत । मुनी करी त्या तृप्त । कार्तवीर्य स्वनगराप्रत । परत निघाला प्रसन्नमनें ।।८।। महामुनीस करी प्रणाम । म्हणे झाला बहु आराम । जमदग्ने तुमची शक्ति अनुपम । आज प्रत्यक्ष अनुभविली ।।९।। त्यासमयीं प्रधान विनयसंयुत । म्हणे नृपासी विशेषयुत । धेनू असे प्रभावयुक्त । एक ह्या ब्राह्मणाजवळी ही ।।१०।। ती गाय आपण मागावी । रत्न असे ती गायींत बरवी । तिच्या विना थोर पदवी । महाराज तुमची व्यर्थ वाटे ।।११।। राज्य

सारें निष्फळ भासत । त्या धेनूविण वैभव रिक्त । त्याचें हें वचन
ऐकून मोहयुक्त । विघ्नपीडित जाहला ।।१२।। म्हणे सचिवास जाऊन
त्वरित । मागावी धेनू मुनीप्रत । ती आज्ञा मिळता सैन्यासहित । दुष्ट
सचिव निघाला ।।१३।। मुनीसमीप जाऊन । प्रणाम तयासी करून ।
म्हणे ही धेनू देउन । तोषवी अतिथीनृपास ।।१४।। तेव्हां जमदग्नी
कोपयुक्त । मुनिसत्तम त्यास म्हणत । महामूर्खा हे अशक्य असत ।
देवस्वरूपी धेनू न देईन ।।१५।। तें ऐकता तो महावीरांस आज्ञापित ।
धेनूस बांधून न्या त्वरित । त्याचे सैनिक आज्ञा पाळित । घेऊन गेले
धेनूसी ।।१६।। धेनूस आश्रमाबाहेर नेती । मुनीच्या क्रोध उपजला चित्तीं ।
गायही संतप्त झाली अती । निर्मिलें महासैन्य तिनें ।।१७।। त्या सैन्यानें
ठार मारिलें । प्रधानासहित सैन्य नष्ट केलें । तो वृत्तान्त ऐकतां क्रुद्ध
झालें । कार्तवीर्याचें अंत:करण ।।१८।। युद्ध करण्या उद्यत । गेला तो
जमदग्नीच्या आश्रमाप्रत । त्या समयीं महासैन्यातें वधित। धेनू
आपुल्या सैन्यानें ।।१९।। कार्तवीर्य होऊन खेदयुक्त । पळाला रणातून
गर्वखंडित । कामधेनू स्वर्गीं परत जात । मुनी एकला वनीं होता ।।२०।।
जमदग्नि होता बेसावध । तेव्हा जाऊन करी वध । हृदयांत बाण मारून
विद्ध । कार्तवीर्य त्या मुनीचा ।।२१।। रेणुका ते पाहून क्रोधयुक्त ।
नृपाची निर्भत्सना करित । एकवीस बाण मारून करित । सर्वांग तेव्हां
विद्ध तिचें तो ।।२२।। होउन अत्यंत क्षुभित । त्या नृपाधमास ती म्हणत ।
राजा तूं मरशील स्वल्पकाळांत । यात संशय कांहीं नसे ।।२३।। दुर्बुद्धे
तुझे सहस्त्र हात । छेदून होतील भग्न त्वरित । हें ऐकता राजा परतत ।
भयोद्विग्न स्वनगरासी ।।२४।। कार्तवीर्य गेल्यावरी रडत । करुणस्वरें
विलाप करित । रेणुका स्मरण करी चित्तांत । आपुल्या प्रिय सुताचें
।।२५।। परशुराम हा तिचा सुत । गेला होता बदरी आश्रमांत । मातेनें

स्मरताच प्रकटत । तिच्या पुढ्यांत अविलंबें ।।२६।। आपुल्या पित्यास मृत । पाहता तो रोदन करित । मातेच्या अंगावरी दिसत । बाणशल्यें रुपलेलीं ।।२७।। ती शल्यें तैसे बाण । ओढून काढी तो तत्क्षण । रेणुका करी तेव्हां सुजाण । सांत्वन आपुल्या पुत्राचें ।।२८।। म्हणे शोक न करी सुता । दत्तात्रेया आण आता । यथाविधि अंत्यसंस्कार तत्त्वता । करील तो या वेळीं ।।२९।। आपण दोघे देहयुक्त । पुन्हा धरूया उत्साह चित्तांत । त्या दुष्ट नृपा मार निश्चित । सहस्त्रकर तोड त्याचे ।।३०।। तेथे त्या नृपाच्या देहांतून । वाहील जें रक्त उसळून । त्यानें तर्पण करून । आपुल्या जनका तोषवी तूं ।।३१।। एकवीस बाण माझ्या शरीरांत । मारिले त्यानें अखंडित । म्हणोनी एकवीस वेळा जगांत । नि:क्षत्रीय पृथ्वी तूं करी ।।३२।। ऐसें सांगून स्वर्गांत । देह त्यागून रेणुका जात । दत्तास बोलावून करित । राम और्ध्वदेहिक पित्याचें ।।३३।। पाचवे दिनीं कर्म करून । दत्तात्रेय गेले स्वस्थानी परतून । भिक्षा मागण्या ते निघून । जाता काय आश्चर्य घडलें ।।३४।। सहावे दिवशीं व्याघ्र येत । त्या जागी एक बळवंत । त्यास पाहून भयसंयुत । परशुराम स्मरे स्वमातेसी ।।३५।। स्मरण करतांच ती येत । शिरमात्र दृश्य असत । तिला पाहून विस्मित । जाहला तेव्हां परशुराम ।।३६।। रेणुका विचारी तयाप्रत । बाळा कां बोलविलेंस आर्त । तुझ्या प्रेमें मी आलें त्वरित । व्याघ्र तैं अन्तर्धान पावे ।।३७।। एवढ्यांत दत्तात्रेय येत । रेणुकेस पाहून रामा सांगत । तूं कां बोलविलें या स्थानाप्रत । रेणुकेसी सांग बा ।।३८।। केवळ शिर तिचें दिसत । न्यून देह ती निश्चित । तरी योग्य क्रियाकर्म त्वरित । करी आतां परशुरामा ।।३९।। तेव्हां योगीश्रेष्ठ दत्तात्रेयास । कथन करी वृत्तान्तास । सर्व कर्म यथासांग करण्यास । दत्तासह तो परशुराम ।।४०।। बाराव्या दिवशीं करित ।

सपिंडीकरण श्रद्धायुत । पाथेय श्राद्ध अर्पित । तेराव्या दिनीं परशुराम ।।४१।। तदनंतर दिव्य देहयुक्त । जमदग्नी आला आश्रमांत । परशुरामास आलिंगन देत । हृष्ट होऊन मुनिसत्तम ।।४२।। तेव्हां दत्त भावगंभीर । जमदग्नीस देई धीर । रेणुकेसही उत्साह पर । बोध करी गणेशाचा ।।४३।। गणेशमंत्रराजाचें भजन । करा दोघे निष्ठा ठेवून । तरी विघ्नविहीन होऊन । शांतिरूप व्हाल तुम्हीं ।।४४।। क्षत्रियाच्या हस्तें मरण प्राप्त । तुम्हांसी म्हणोनी शांति न लाभत । विघ्नराजा हे न जाणता न होत । दु:खौघाचा नाश जगीं ।।४५।। ऐसें सांगून त्यांसी देत । गणेशमंत्र एकाक्षर तयांप्रत । तो जपता ती उभय होत । तपोयुक्त तेज:पुंज ।।४६।। दत्त हर्षसमन्वित । आपुल्य आश्रमीं परत जात । मातापित्यांच्या सेवेंत रत । परशुराम तेथेंचि राहिला ।।४७।। जनदग्नि रेणुका पुन: जीवित । झाले ऐसा प्रभाव अद्भुत । संस्कारकर्माचा साक्षात । परशुरामें अनुभविला ।।४८।। जरी पुनर्जीवन झालें प्राप्त । परी चित्त होते अशांत । त्या उभयतासी लाभत । परम शांती गणेशमंत्रें ।।४९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते रेणुकाजमदग्निसंजीवनकरणं नाम षट्त्रिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय छत्तीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मुद्गल दक्ष प्रजापतीस । कथा सांगती पुढती सुरस । सहस्त्र वर्षें तपे विश्वेश्वरास । दया आली जमदग्नीची ।।१।। तैसीच अनुकम्पा रेणुकेप्रती । वाटून गजानन प्रकटती । म्हणती रेणुके काय चित्तीं । तें सांग मज आतां ।।२।। जमदग्ने एकाक्षर विधानें माझ्या चित्तास । तैसेंचि तपानें तोषविलेंस । ऐकून त्या रम्य वचनास ।

भार्गवदाम्पत्य हृष्ट झालें ।।३।। गणराजास भक्तिसमन्वित । ती उभयता प्रार्थित । धन्य वंश माझा सांप्रत । गणेशा तुमचें दर्शन झालें ।।४।। आमुचा स्वाध्याय तप धन्य । आम्हांसारखा न कोणी अन्य । आमुचे फळा आलें पुण्य । यांत संशय मुळीं नसे ।।५।। ऐसें सांगून प्रणाम करिती । गणेश्वरासी पूजिती । रोमांचित शरीरें त्यांची होतीं । स्तुति करिती हर्षभरें ।।६।। विघ्नपालासी भक्तविघ्नहर्त्यासी । अभक्तांना विघ्नकर्त्यासी । ब्रह्मभूतासी अनादीसी । वक्रतुंड स्वरूपासी नमन ।।७।। गणेशानासी नाना शक्तियुतासी । अनंत गणांच्या पतीसी । नानाभेदकरासी । नानाभेदविहीना नमन ।।८।। हेरंबासी सिद्धि बुद्धिवरासी । अमेयमायेनें खेळकर्त्यासी । सिद्धिबुद्धिसहायासी । स्वानंदपतीसी नमन असो ।।९।। भक्तांसी योगदात्यासी । योगाकारासी योगासी । शांतिदासी अखंडानंदरूपासी । भुक्तिमुक्तिप्रदा नमन ।।१०।। लंबोदरासी देवासी । एकदंतासी महोदरासी । विघ्नपतीसी सुखदायीसी । मूषकध्वजा तुज नमन असो ।।११।। मूषकवाहनासी चतुर्भुजासी । सर्वांच्या आदिपूज्यासी । भोगीसी ज्येष्ठराजासी । सर्वांसी मातृपितृस्वरूपा नमन ।।१२।। ज्याचें असमर्थ करण्या स्तवन । वेद देव योगीजन । शिवादी देवही थकले उन्मन । तेथे आम्ही काय वर्णावें ।।१३।। ऐसी स्तुति करून । गणेशातें प्रणाम करून । भक्तीनें स्तवन रचून । दोघेही पडली पायावरी ।।१४।। त्या उभयतांसी वर उठवित । गणाधीश तैं हर्षसंयुत । म्हणे वर मागा जो असेल वांच्छित । भक्तिभावें प्रसन्न मी ।।१५।। गणेशाचें वचन ऐकती । नंतर तयासी म्हणती दंपती । प्रणाम करून पाय स्पर्शिती । हर्षोत्फुल्ल चित्तानें ।।१६।। जरी प्रसन्नभावें वर देसी । तरी भक्ति दे सुखप्रद ऐसी । तुझ्या पादपद्मीं योगशांतीसी । देई विघ्नेशा योगेशा ।।१७।। जी योगशांती गाणपत्यांस । प्रिय

असे विशेष । सदा आनंदात्मिक रूपास । योगेशा येथ मागतों ।।१८।। तथास्तु म्हणून सांगत । त्यांचा भक्तिभाव पाहून हर्षित । गणेश सुखदायक भक्तांप्रत । म्हणे तुमचे स्तोत्र उत्तम ।।१९।। तुम्ही रचिलेलें स्तोत्र जगांत । वाचकां योगप्रद निश्चित । जो जें वांच्छि नर भक्तियुत । तें तें देईन स्तोत्र पाठका ।।२०।। जमदग्ने तूं हो सदा शांत । माझा निस्सीम भक्त । रेणुके तूं देहयुक्त । भज मजला योगभाविता ।।२१।। लोक तुज धडाविरहित । केवळ मस्तक रूपें पाहत । देवतादीस तूं दिसत । ज्ञानदृष्टीनें अंगसहित ।।२२।। ऐसें बोलून अन्तर्धान । पावला ब्रह्मनायक गजानन । रेणुका जमदग्नी गमन । करिती नंतर स्वाश्रमाप्रती ।।२३।। पुढें एकदा परशुराम । प्रणिपात त्यांस करून अभिराम । साक्षात विष्णु प्रतापी मनोरम । ऐसें बोलता जाहला ।।२४।। अर्जुनास मी मारीन । श्रीराम तो हें सांगे वचन । नि:क्षत्रिय पृथ्वी करीन । आई बाबा नि:संशय ।।२५।। तुमच्या आज्ञेचें पालन करीन । तेव्हां जमदग्नि म्हणे आनंदून । वृथा हिंसा करूं नको रे रागावून । रामा गर्व तूं सोडी ।।२६।। तेव्हां त्या भार्गवा राम सांगत । मातेपुढें पूर्वी प्रतिज्ञाव्रत । घेतलें मुनीश्वरा तें जगांत । सत्य करून दाखवीन ।।२७।। मातृभक्तिपरायण मी करीन । तदर्थ प्राणांचेंही दान । त्याचा आग्रह पाहून । जमदग्नि म्हणे पुत्रासी ।।२८।। ऐसा जर तुझा निश्चय । तरी तूं शंकरास पूजी निर्भय । त्याची उपासना करता ध्येय । पूर्ण तुझें होईल ।।२९।। तो अभीष्ट पूर्ण करील । ऐसें ऐकता वचन निर्मल । कैलासीं जाई राम सबल । शंकर प्रभूसी वंदन करी ।।३०।। महेशाचें स्तवन करित । तेणें तो प्रसन्न होत । परशुराम तयासी सांगत । हृद्गत आपुलें सफल व्हावया ।।३१।। कार्तवीर्यासी मी मारीन । नि:क्षत्रिय पृथ्वी करीन । एकवीस वेळां दिलें वचन । जैंसें मी आईसी ।।३२।। तरी

हें सफल होण्यास । काय उपाय असे विशेष । तो सांगावा मज भक्तास । तेव्हां शंभू काय करी ।।३३।। गणेशाचा एकाक्षर मंत्र देत । परशुरामासी प्रभावयुत । राम प्रणाम करून स्वीकारित । नंतर गेला वनामाजी ।।३४।। पूर्व जन्मीं वामन अवतारांत । त्याने जें केलें गणेशतप उदात्त । तें तेव्हां परशुराम स्मरत । विष्णूचा अंश प्रत्यक्ष ।।३५।। वायुभक्षण करून राहत । गणेश एकाक्षर मंत्र जपत । समाधि लावी ध्यानसंयुत । महा उग्र तप केलें ।।३६।। तेणें विघ्नप तोषला । वर्षशतानें प्रकटला । भक्तापुढें जो जाहला । महा उग्र तप भक्तियुत ।।३७।। त्या महाभागा भार्गवाप्रत । विष्णूस अव्यया म्हणत । वर माग मी भक्तितोषित । देईन जें मागशील ।।३८।। त्याचें हे रम्य वचन । ऐकून करी साष्टांग नमन । गणपतीचें विशेष पूजन । करूनी जोडी करांजलि ।।३९।। भक्तिरसानें संप्लुत । अश्रु लोचनांतून ओघळत । राम करी स्तुति पुनित । गणेशाची त्या समयीं ।।४०।। गणनाथा भक्तानंदविवर्धना । भक्तिप्रिया देवा गजानना । हेरंबा वेदांतवेद्यरूपा प्रसन्ना । नमन तुजला पुन:पुन्हां ।।४१।। मनोवाणीमया योगाकारा । मनोवाणीविहीना गजवक्त्रा । निर्गुणात्म प्रधारका नराकारा । कंठाखालती सगुणा नमन ।।४२।। अनादी सर्वपूज्या सर्वदायका । आदिपूज्या विघ्नेशा नानाविध चालका । विघ्नहर्त्या भक्तसुखकारका । दुरात्म्यांसी विघ्नकर्त्या नमन ।।४३।। सदा स्वानंदनाथा ढुंढिराजा । वक्रतुंडा लंबोदरा शंकरात्मजा । सतत शांतिरूपा देवराजा । शांतिदा तुज नमन माझें ।।४४।। महोदरा सिद्धिबुद्धिपते नमन । नाना ऐश्वर्यदात्या वन्दन । भ्रमदा मोहकर्त्या अभिवादन । नानाज्ञानप्रभेदकरासी ।।४५।। सुभक्तांचें भ्रममोहादी हरिसी ।। नाना दैत्यांसी मारिसी । देवांचा तूं मद हरिसी । सुरासुरमया नमस्कार ।।४६।। सर्वत्र योगरूपा संयोग । तैसाचि तुज ना अयोग ।

तुझ्या स्तुतीचा योग । विघ्नेशा कैसा शक्य मजला? ।।४७।। गणाध्यक्षा शेष शिवादीस न जमलें । तें मज कैसें जमणार भलें । तुझें स्तवन कितीही केलें । तरी तें अपूर्णच राहील ।।४८।। म्हणोनी जोडोनिया कर । तव चरणीं ठेवितों शिर । नाथा पालन करी सत्वर । आश्रया तुझ्या मी आलों ।।४९।। ऐसी स्तुति तो करित । भक्तिभावें कंठ दाटत । अंगावरी रोमांच फुलत । परमानंदें नृत्य करी ।।५०।। जय विघ्नेश जय हेरंब गणेश । तूं सर्व जगाचा ईश । ऐसें गायन करी विशेष । प्रसन्न झाला गजानन ।।५१।। भक्तिनिमग्न त्यास पाहत । साश्रुनेत्र रोमांचयुत । गणेश त्या भक्ता म्हणत । रामा महाभागा ऐक ।।५२।। ऐक माझें परम वचन । धन्य तूं सर्वभावें महान । माझ्या भक्तींत निमग्न । स्तोत्र रचिलें हे रसपूर्ण ।।५३।। भक्तिरसप्रद हें स्तोत्र वाचील । अथवा जो हें ऐकेल । श्रद्धापूर्वक ध्यायील । त्याची सकल बाधा हरीन ।।५४।। येथ भोगून अखिल भोग । अन्तीं स्वानंदलोकाचा योग । जें जें वांच्छील सत्त्वग । तें तें देईन केशवा ।।५५।। मजला तो नर मान्य सदा । संशय यांत न कदा । माझ्या भक्ता संपदा । सदैव मी देईन ।।५६।। माझा हा परशू तुजला । आज मी रे असे दिला । माझी तुल्यता जगाला । तुझ्यांत आतां दिसेल ।।५७।। सर्व राजांसहित सहस्रार्जुन । पावेल तव हस्तें पराभव महान । पृथ्वी निःक्षत्रिय पावन । करशील एकवीस वेळा तूं ।।५८।। सदैव तूं जयसमन्वित । ह्या माझ्या परशूनें ख्यात । म्हणोनि परशुराम नामें ज्ञात । सर्वत्र जगीं होशील ।।५९।। तुझें नाम हे सुखप्रद । स्मरणें होईल शुभद । यज्ञ करूनिया यश विशद । भूमीवरी मिळेल तुजला ।।६०।। ऐसें उज्ज्वल यश लाभून । शांतियोगें माझे भजन । करशील तूं नितनेम पावन । ऐसें दिलें वरदान ।।६१।। नंतर गणेश्वर अन्तर्धान । पावला

जेव्हां तो गजानन । रामें स्थापिली मूर्ति तत्क्षण । ब्राह्मणांसी बोलावुनी ।।६२।। त्यानंतर पूजा करून जात । परशुराम स्वगृहाप्रत । चित्तांत हर्षसमन्वित । मातापित्यांस वंदन करी ।।६३।। परशुधर तो आज्ञा घेत । बंधूसंगें मग निघत । कार्तवीर्या आव्हान देत । महाबळी तो पराक्रमी ।।६४।। सिद्ध कवचांनी युक्त । अन्य नृप लढण्या येत । जे देवादींसही कठिण असत । जिंकण्या ते सर्व आले ।।६५।। गणेशवरदानें परशुराम । करीं धरी परशु अभिराम । त्याच्या तेजें संग्राम । गाजविला तयानें ।।६६।। कार्तवीर्याचें हजार हस्त । रोषें तो तोडून टाकित । नंतर परशूनें ठार मारित । महाघोर युद्ध करूनिया ।।६७।। नंतर विजयी परशुराम होत । क्षत्रियांच्या वधात रत । निःक्षत्रिय पृथ्वी करित । क्रोधसंयुक्त परशुराम ।।६८।। पुनः ब्राह्मणवीर्यें जन्मत । क्षत्रिय प्रबळ जगीं होत । राम त्या सर्वांसी मारित । पुनः पुन्हा स्वप्रतापानें ।।६९।। एकवीस वेळा निःक्षत्रीय अवनी । करून रक्तें तोषविली जननी । यज्ञ करून पृथ्वी दानी । दिधली त्यानें ब्राह्मणासी ।।७०।। तेव्हां तयाच्या निवासार्थ देत । नवीन भूमि सागर भयभीत । अन्यथा बाणें त्या हटवित । परशुराम तो प्रतापी ।।७१।। त्या परशुरामभूमीवरी । राहून गणेशाचें भजन करी । अनन्यभावें ध्यान करी । अद्यापही तो गाणपत्य ।।७२।। चिरंजीव तो गणनायका स्मरत । अखंड त्या नवभूमींत । हें कार्तवीर्य आख्यान अद्भुत । दक्षा तुज सांगितलें ।।७३।। रामाचें जमदग्नि रेणुकेचें । चरित्र हें आश्चर्यकर साचें । हें वाचितां ऐकतां नराचे । चिंतितार्थ पूर्ण होतील ।।७४।। भक्तीनें करिता वाचन । भुक्तिमुक्तिप्रद हें महान । चरित्र उद्बोधक पावन । ऐसें रहस्य जाण दक्षा ।।७५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि

श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते परशुराम चरितकथनं नाम सप्तत्रिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सदतीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । कार्तवीर्याचे शंभर सुत । होते महारथी वीरव्रत । परी पांच यशस्वी त्यांत । धर्मात्मे शूर प्रख्यात ।।१।। जयध्वज शूरसेन वृषभ असत । पुरुर्जित नामें ख्यात । मुद्गल सांगती दक्षाप्रत । वर्णन त्यांच्या वंशजांचें ।।२।। जयध्वजाचा तालजंघ सुत । होता बहु प्रतापवंत । त्यास झाले पुत्रशत । ख्यात झाले तालजंघ ऐसे ।।३।। महाबाहु ज्येष्ठ त्यांच्यात । वीतिहोत्र तो असत । वृषप्रभृती अन्य होत । यादव पुण्यकर्मकर ।।४।। वृषाचा होता वंशकर । मधुनामें एक पुत्र । त्या मधूचे शतपुत्र । ज्येष्ठ त्यांतील वंशकृत वृष्णि ।।५।। वीतिहोत्राचा अनंत सुत । दुर्जय त्याचा पुत्र ख्यात । सर्व शास्त्रांत पारंगत । भार्या त्याची गुणवती ।।६।। ती होती पतिव्रता उदार । दुर्जय प्रेम करी तिजवर । परी एकदा वनांत सुंदर । उर्वशी अप्सरा त्यानें पाहिली ।।७।। तिच्यावर होऊन आसक्त । आपुल्या पत्नीस न स्मरत । ऐसा बहुत काळ जात । पुढें कण्व त्यासी बोध करी ।।८।। म्हणोनी तो स्वगृहीं परतत । करी नंतर प्रायश्चित । कण्व त्याच्या हस्ते यज्ञ करवित । विनीत तो नृप जाहला ।।९।। त्याचा पुत्र सुप्रतीक ख्यात । सहस्रजिताचे हे कुलसंजात । यदुपुत्राचा वंश सांप्रत । क्रोष्टयाचा ऐक दक्ष प्रजापते ।।१०।। क्रोष्ट्याचा वृजिवान् एक सुत । त्याच्या च्छ्‌वादी ज्ञात । त्याचा कुशेकु पुत्र ख्यात । चित्ररथ सुत त्याचा ।।११।। चित्ररथाचा पुत्र असत । शशबिंदू नामें प्रख्यात । त्याचे दशलक्ष सहस्र सुत । पृथुश्रवा ज्येष्ठ तयांमध्यें ।।१२।। उशना नामा त्याचा सुत । धर्म नामें झाला ख्यात । रुचकनामक आत्मज

विश्रुत । त्याचे पुत्र पांच होते ।।१३।। वंशधर त्या माजीं ज्यामधे असत । जो होता लोकीं ज्ञात । विदर्भ नामा त्याचा सुत । विदर्भात्मज कुशक्रय ।।१४।। लोमपाद त्याचा तृतीय सुत । बभ्रु त्याचा आत्मज ख्यात । त्याचा आत्मज कृतिनाभ असत । उशिक होता कृतिपुत्र ।।१५।। चेदिनाम उशिक सुत । त्या चेदीचा चैद्य विश्रुत । त्याचा पुत्र महाबाहू ज्ञात । प्रभावें कौशिक नावानें ।।१६।। त्याचा पुत्र धीमन्त अमल । सुमन्तु नामें महाबल । त्याचा पुत्र नि:श्वेत प्रबल । त्यास शंभर पुत्र झाले ।।१७।। दक्षप्रजापते त्या क्रथापासून । कुंति धृष्टी निर्वृति महान । दशार्ह नृप व्योम त्यापासून । व्योमापासून जीमूतक ।।१८।। त्यानंतर विकृति पुत्र जन्मत । भीमरथ विकृतीचा सुत । भीमरथपुत्र नवरथ ख्यात । त्याचा पुत्र दशरथ ।।१९।। दशरथाचा पुत्र शकुनी । करंभि जन्मे त्यापासुनी । देवरात करंभिसुत होऊनी । अश्वमेध यज्ञ त्यानें केला ।।२०।। देवराताचा देवक्षत्र सुत । त्याचा मधु मधूचा कुरु असत । कुरूचे दोन पुत्र ख्यात । सुत्रामा अनु नाम ।।२१।। अनूचा पुत्र पुरुहोत्र । त्या पुरुहोत्राचा आयु पुत्र । आयूचा सात्त्वत पुत्र । त्यास जाहाले सात सुत ।।२२।। भजमान भजि दिव्य हे तीन । वृष्णि देववृध अंधक महान । महाभोज सातवा बलवान । यादवांत विख्यात जे ।।२३।। भजमानाचे निम्लोचि सुत । वृष्णी किंकण ख्यात । देववृध पुत्रार्थ आचरत । तप मनोभावें करूनी ।।२४।। त्याचा बभ्रु नाम सुत । पुण्यश्लोक महायश विख्यात । सर्व शास्त्रार्थ कोविद असत । त्याचे पुत्र श्लोकद्वय ।।२५।। यश तेज कारणें विराजत । तो राजा त्रैलोक्यांत । महाभोज कुळांत जन्मत । म्हणोनि भोज नामें ज्ञात ।।२६।। वृष्णीचे पुत्र सुमित्र । युधाजित तैसा अनमित्र । अनमित्राचा शिनिनाम पुत्र । त्याचा सुत निम्न नाम ।।२७।। सत्राजित प्रसेन विख्यात । निम्नचे दोन सुत । सत्राजित सूर्यासी आराधत ।

स्यमंतक मणि त्यास लाभे ।।२८।। शिनीचा सत्यसंपन्न आत्मज । सत्यकनामा महातेज । त्याचा पुत्र सात्यकी बलज । जयनामक त्याचा पुत्र ।।२९।। तदनंतर कुणी धीमान । त्याचा युगंधर नाम सुत । अनमित्राचा अन्य सुत । वृष्णिनाम शस्त्र विशारद ।।३०।। वृष्णीचे श्वफल्क चित्ररथ सुत । श्वफल्क काशिराज कन्येसी विवाह करीत । त्याचा पुत्र अक्रुर ख्यात । साधुसंमत जो होता ।।३१।। आसंग सारमेयादी ज्ञात । बारा पुत्र त्याचे जगांत । देववानाचा पुत्र उपदेवक असत । चित्ररथाचे सुतद्वय ।।३२।। पृथु अपृथु नामें ज्ञात । अश्वग्रीव सुबाहू विख्यात । सुधाश्वादी होते सुत । अंधकाचे चार पुत्र ।।३३।। कुकुर भजमान शुचि तीन । चवथा कंबलबर्ही महान । कुकुरापासून वह्नि जन्मून । त्याचा सुत कपोतरोमा ।।३४।। त्या कपोतरोमाचा अनुनाम सुत । तो तुंबुरूचा मित्र असत । त्याचा पुत्र अंधक स्मृत । अंधक सुत दुंदुभी ।।३५।। तो दुंदुभी गोवर्धन पर्वतावर । विपुल तप करी घोर । ब्रह्मदेव देई त्यास वर । मनोवांच्छित पूर्ण व्हावें ।।३६।। तुझा वंश अक्षय होईल । कीर्तनादिकांत रमेल । सुरांशी मैत्री जोडतील । कामरूपित्व तव वंशजांसी ।।३७।। त्या दुंदुभीचा अरिद्योत सुत । जो होता तेजयुक्त । अरिद्योताचा पुनर्वसु ख्यात । त्याचा पुत्र आहुक ।।३८।। आहुकापासून उग्रसेन । देवक तैसा महान । देवकाचे पुत्र पावन । देव उपदेव सुदेव ।।३९।। देववर्धन नाम बलवान । सात बहिणी त्यांच्या महान । त्या सर्व वसुदेवभार्या होऊन । जगीं ख्यात जाहल्या ।।४०।। धृतदेवा देवासाश्रित उपदेवा । श्रीदेवा शांतिदेवा सहदेवा । देवकी सातवी सौम्य स्वभावा । सातही दिल्या वसुदेवासी ।।४१।। उग्रसेनाचे पुत्र असत । कंस मुख्य महाबळ ज्ञात । भजमानाचा महायश ख्यात । विदूरथ त्याचा सुत असे ।।४२।। तदनंतर शूर शिनि स्वयंभोज असत । परंपरा ही वंशजांची प्रख्यात ।

हृदिक देहबाहु शतधनु ज्ञात । कृतवर्मा तदनंतर ।।४३।। त्यानंतर देवमीढ शूरक । दहा पुत्र वसुदेवादी धर्म उपासक । वसुदेवाचा सुत एक । वासुदेव जगद्गुरु ।।४४।। तो देवकीचा झाला सुत । देवांची प्रार्थना ऐकून जन्मत । हरीच भूमीवर साक्षात । साधूंचे रक्षण करावया ।।४५।। वसुदेवापासून लाभत रोहिणी । संकर्षण ज्येष्ठ गुणख्यातजनीं । शेषांश हलायुध वीराग्रणी । उमा देहधारी जाहली ।।४६।। कौशिकी योगनिद्रा होत । वासुदेवाचें योगें यशोदेस ज्ञात । जे अन्य वसुदेवाचे ज्येष्ठ सुत । कंसे मारिलें जन्मतां ते ।।४७।। सुषेण दायि भद्रसेन । महाबळ ऋतु संमर्दन । भद्र तैसा कीर्तिमान । हे वसुदेवसुत कसे वधिले? ।।४८।। ते मृत्युमुखीं पडत । तैं रोहिणी जन्म देत । वसुदेवासी प्रख्यात । हलायुध बलभद्रासी ।।४९।। बलरामा जन्मानंतर प्रसवत । देवकी आत्मा अच्युत । कृष्ण जो श्रीवत्सलांछन वक्षयुक्त । अन्य वंशवर्णन पुढिल अध्यायीं ।।५०।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते हरिवंशवर्णनं नामाष्टत्रिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अडतिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । हरिवंशाचें वर्णन । मुद्गल करिती पुढती महान । बलरामाची भार्या गुणवान । रेवती सुरूप सुस्वभावी ।।१।। निषेध उल्मुक हे दोन सुत । रामापासून तिज होत । सोळा हजार एकशे आठ बायका ख्यात । कृष्णाच्या ज्या अतिसुंदर ।।२।। त्यांच्यापासून तयास होत । शेकडों हजारों सुत । प्रत्येक भार्येस दहा सुत । एक कन्या जाहली ।।३।। प्रद्युम्न सांब मुख्य सुत । महातेजोयुत ख्यात । महारथ महाभाग ते ज्ञानसंयुत । प्रद्युम्नाचा सुत अनिरुद्ध ।।४।।

त्या प्रतापवंत अनिरूद्धाचा सुत । वज्र नामक वंशदीप ख्यात । मुसळापासून तो अवशिष्ट । ऐसे नानाविध नृप ।।५।। त्या सर्वांचे नामवर्णन । अशक्य दक्षा मज जाण । तेव्हां दक्ष विचारी प्रश्न । विष्णू मानव देह कैसा धरी? ।।६।। मुद्गल म्हणती कथा असत । यामागें प्राचीन पुनीत । ती तुज सांगून संशय समस्त । दूर करीन मी तुझा ।।७।। पूर्वी एकदा दैत्येशां जिंकित । देव विष्णु समन्वित । तेव्हां राज्य त्यागून वनांत । दैत्य लपले भयानें ।।८।। त्यांस शोधून मारण्या उद्युक्त । देव शस्त्रधारी जात । प्रल्हाद प्रमुख सर्व भयभीत । असुर तेव्हां जाहले ।।९।। ते सर्व हात जोडून प्रार्थित । राज्य सोडून आलों वनांत । शस्त्रास्त्रांनी विहीन अनाथ असत । आम्हां कां हो मारतां? ।।१०।। देवांनो आमुचें सर्व राज्य घेतलें । तरी आतां कां शस्त्र धरिलें? । आता आम्हां पाहिजे रक्षिलें । कृपा करून देवानों ।।११।। आम्ही आज दीन झालों । आमुच्या वैभवासी मुकलों । म्हणोनी दयायाचना करण्या आलों । सांप्रत प्राज्ञांनो रक्षावें ।।१२।। तथापि विष्णूनें प्रेरित । ते देव दानवां मारण्या उद्यत । तेव्हां असुर पलायन करित । शरण जाती शुक्राचार्यासी ।।१३।। योगनिधि भृगु दैत्यांचे गुरु । असुरांसी मारण्या सत्वरू । त्यांच्या मागून देव जाती हरूं । दैत्यजीवितासी क्रोधानें ।।१४।। जेव्हां असुर भृगुच्या आश्रमांत । प्रवेश करिती भयभीत । तेव्हां दक्षा शुक्राचार्य वनांत । गेले होते समिधा आणण्या ।।१५।। म्हणुनी दानव भृगपत्नीप्रती । हात जोडून प्रार्थिती । देवांपासून रक्षी सांप्रती । अन्यथा तुझ्यापुढें प्राण त्यजूं ।।१६।। त्यांचे वचन ऐकून म्हणत । सुखप्रद शब्द तयांप्रत । भिऊं नका निवारीन मी सांप्रत । देवांसी यांत संशय नसे ।।१७।। हें आश्वासन ऐकती । तेव्हां दानव निश्चिंत होती । हृदयांत ते संतोषती । निःश्वास सोडिती धैर्यानें ।।१८।। एवढ्यांत तेथ येत ।

विष्णु पुरोगम देव भृगुआश्रमांत । आयुधें सज्ज त्यांच्या करांत । दैत्या मारण्या सरसावले ।।१९।। त्यांसी म्हणे भृगूची कान्ता । असुरहिंसा नको आतां । दैत्य माझ्या शरण येतां । तुम्ही त्यांना न पीडावें ।।२०।। हे असुर राज्यहीन । माझ्या आश्रया आले दीन । शरणागतांसी रक्षणाचे वचन । भृगुपत्नी मी देत आहे ।।२१।। परी तिचें वचन न ऐकत । देवेंद्र विष्णूने प्रेरित । वज्र उगारून धावत । दैत्यां मारावया क्रोधानें ।।२२।। तेव्हा भृगुपत्नी क्रोधयुक्त । तप:प्रभावें स्तंभित करित । देवराजा इंद्रासी त्वरित । विष्णु तेव्हां कोपला ।।२३।। त्यानें आपुलें तीक्ष्णधार चक्र सोडून । भृगुपत्नीचें शिर केलें छिन्न । तें शिर धरातली पडून । हाहा:कार माजला ।।२४।। त्याचक्षणीं भृगु परतत । मृत पत्नीस जेव्हां पाहत । क्रोधें खदिरांगारासम दिसत । डोळे त्याचे संतप्त ।।२५।। तो विष्णूस शाप देत । तूं धरणीतलावर पडशील त्वरित । ब्राह्मणीच्या वधें देवाधमा बुद्धींत । संभ्रम तुझ्या होईल ।।२६।। आपुल्या तपानें सजीव करित । ज्ञानानें पत्नी क्षणांत । दानवांचेंही रक्षण होत । भृगुप्रभावें त्या समयीं ।।२७।। तेव्हां विष्णुदेव शोकसमन्वित । शरण विघ्नराजास जात । पवित्र मयूरक्षेत्रांत । तेथ तप उग्र करी ।।२८।। एक वर्ष निराहार राहत । भक्तीनें विघ्नपा तोषवित । गणराज भक्तिनियंत्रित । प्रकट झालें विष्णूपुढें ।।२९।। म्हणती महाविष्णूप्रत । वर माग तूं हृदयेप्सित । तें ऐकतां प्रणाम करित । विष्टरश्रवा वरती उठून ।।३०।। गणेशासी भक्तिभावें स्तवित । अथर्वशीर्षपाठें तोषवित । गणेश पुनरपि म्हणे तयाप्रत । केशवा वर माग आतां ।।३१।। श्रीविष्णु तेव्हां प्रार्थित । जरी वर देसी मनोवांच्छित । तरी भृगूचा शाप मज न बाधत । ऐसें करी महाप्रभू ।।३२।। येथेंच निवास संस्थान । देई मजसी जेथ तुझें भजन । निर्विघ्नपणें सर्वदा करीन । स्वामी मज करी त्वत्पद प्रिय

।।३३।। तथास्तु म्हणून ढुंढी सांगत । विष्णू तुज चिंता नको चित्तांत । माझें वचन ऐक हित । भृगू माझा परमभक्त ।।३४।। त्याची वाणी कदापि न होत । असत्य ह्या जगतांत । म्हणून तूं मृत्यूलोकांत । पडशील यांत संशय नसे ।।३५।। तेथ ज्ञान तव नष्ट न होईल । स्वेच्छाचारी तूं होशील । माझ्या प्रसादें सुखमय असेल । जीवन तुझें त्या वेळीं ।।३६।। देव तुज प्रार्थितील । दैत्यवध याचना करतील । धर्मसंस्थापनार्थ घेशील । अवतार तूं मृत्युलोकी ।।३७।। तेथ तुझी विशेष कीर्ति । यश महान होईल जगतीं । पृथ्वीवरी स्थापना निश्चिती । करशील अल्प परंपरेची ।।३८।। तुझे परमभक्त बहुत । होतील ते जगतांत । त्यांच्या चतुर्विध इच्छा निश्चित । पुरवशील तूं विष्णू सदा ।।३९।। देवांचे कार्य करून । जनार्दना जाशील तूं परतून । आपुल्या वैकुंठलोकीं प्रसन्न । स्वच्छंदानें तदनंतर ।।४०।। स्वेच्छेने देहधारी होशील । माझ्या प्रसादें वांच्छित पुरेल । हृषीकेशा सर्वदा राहशील । प्रसन्न तू या क्षेत्रीं ।।४१।। जें अन्य तूं प्रार्थिसी । तें तें जगात पावसी । या क्षेत्रांत तुजसी । देत असे अक्षय स्थान ।।४२।। ऐसें सांगून अन्तर्धान । नंतर पावला गणेश महान । करुणानिधि तो गजानन । विष्णू तेथ निवास करी ।।४३।। भावभक्तीनें पूर्व दिशेंत स्थापित । गणनायक मूर्ति मयूरक्षेत्रात । विष्णुविनायक ऐसें नाम ठेवीत । द्विजगण त्या समयीं ।।४४।। दक्षा हें तुज सांगितलें । विष्णूचें देहधारित्त्व कारण भलें । नाना योनिसमुद्भव झाले । देवाधिप कैसे तें ।।४५।। ओमिती श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते विष्णुदेहधारणवर्णनं नामैकोनचत्वारिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकोणचाळिसांवा संपूर्ण)